भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ८६

श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर
स्मारक-ग्रंथमाला क्र. ५ वा

—ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड ९—

# मराठी राजवटींतील
# कांहीं घाटमार्ग व चौक्या

शंकर नारायण वत्स जोशी
चिटणीस—भा. इ. सं. मं.-पुणें



शक १८७५ आश्विन वद्य ८ | किंमत ३ रु. | इ. १९५३ आक्टोबर २९

# निवेदन

हा ग्रंथ **श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर स्मारक-ग्रंथमालें**तील पांचवा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध होत आहे हें सांगण्यास फार आनंद वाटतो. श्रीमंत बाबासाहेब ह्यांना ह्या मंडळासंबंधानें म्हणजे मंडळाकरवीं चालू असलेल्या महाराष्ट्रेतिहासाचे कामाबद्दल किती आस्था व आपलेपणा वाटत होता हें कांहीं येथें उदाहरणानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. वेदविद्येविषयीं जितकें ते प्रेमी तितकीच आस्था व कळकळ त्यांस महाराष्ट्रवाङ्मयांतील महाराष्ट्रेतिहासाबद्दल वाटे. त्यास अनुसरून त्यांच्या स्मारकसमितीच्या साक्षेपी विश्वस्त-सदस्यांनीं ह्या मंडळामार्फत इ. स. १९४७-१९५० असे चार ग्रंथ प्रसिद्ध करण्यास सहाय्य दिलें. मध्यंतरीं एकदोन वर्षे तसें कांहीं घडलें नाहीं, तथापि यंदापासून पुनः तो योग साधत आहे ह्याबद्दल विश्वस्त मंडळीस महाराष्ट्रांतील जाणीक जनता धन्यवाद देतील ह्यांत शंका नाहीं. मंडळ तर त्यांचे ऋणीच आहे.

प्रस्तुत ग्रंथ कशा स्वरूपाचा म्हणजे महाराष्ट्रेतिहासाचें एक नवेंच दालन उघडून देणारा आहे हें त्याच्या नांवावरून दिसून येईल. थोड्याशा घाईंतच ग्रंथाचें काम झालें आहे. अशा ग्रंथास नकाशे वगैरेची जोड त्यामुळें देतां आली नाहीं व हें प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. आतांपर्यंत संकलित अशी इतक्या घाटमार्गांची नोंद साधार मांडली गेली नव्हती तो उपक्रम ह्या पुस्तकानें केला आहे. असो. पुनः एकदां विश्वस्तांचे त्यांनीं केलेल्या साह्याबद्दल आभार मानून प्रस्तुत ग्रंथ वाचकांस सादर करतों.

श्रीमंत बाबासो स्मृतिदिन
आश्विन वद्य ७ श. १८७५

**चिटणीस**
भा. इ. सं. मं.

श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजीकर



जन्म श. १७९२ मृत्यु श. १८६५ आश्विन वद्य ८



# प्रस्तावना

१. ह्या पुस्तकांत एकंदर ८७ ऐतिहासिक कागद छापले आहेत. त्यांतहि पुस्तकाच्या नांवाप्रमाणें पहिले ४६ कागद घाट–पांडेपणाची माहिती देणारे आहेत. आतांपर्यंत पुणें, सुपें, अकोले, इंदापूर, बहाळ, वांई, रोहिडखोरें, जमखंडी इत्यादि प्रांत म्हणजे देश व त्या त्या देशपांडे–घराण्याकडील कागद मिळाले तसे छापले. तसेंच गांव-पांडे म्हणजे गांव–कुलकर्णी यांजकडीलहि कागद मिळाले ते छापले. पण येथें **घाट–पांडे** यांजकडील कागद मिळाले व ते छापले हा ह्या पुस्तकाचा विशेष होय.

२. गांव–पांडे किंवा देश–पांडे हीं घराणीं जशीं गांवोगांव व प्रांतोप्रांत आढळतात त्याप्रमाणें ह्या घाटपांडे घराण्याचें नाहीं. हें घराणें स्थलवैशिष्ट्यामुळें एखादेंच असावयाचें. अर्वाचीन महाराष्ट्राचे भाग दोन: कोकण व देश; कोकणांतून देशावर येण्यासाठीं सह्यपर्वताच्या निरनिराळ्या डोंगरांतून ज्या वाटा म्हणजे घाट मार्ग; त्या घाटमार्गावरील जे अधिकारी ते घाट–पांडे. अर्थात् इतर देशपांडे–घराण्यांप्रमाणें हें घाटपांडे–घराणें प्रांतागणिक आढळणार नाहीं हें उघड आहे. अशा प्रकारचे शिवकालापासूनचे ऐ० कागद प्रथमच येथें प्रकाशित होत आहेत.

३. गांव–पांडे, देश–पांडे, पांढरी–पांढे, घाट–पांडे ह्यांतील पांडे म्हणजे लेखनाधिकारी; लेखक. त्या त्या कामाची पंडिती म्हणजे विद्या अवगत असलेला अधिकारी लेखक तो पांडे. हा लेखक किंवा पांडे शब्द अनेक संत–कवींनीं आपलें गांव–कुळकर्णपण किंवा देशकुलकर्णपण सांगतांना 'ग्रामलेखक' 'देशलेखक' असा योजिला आहे व नुसता पांडे–शब्द हि वापरला आहे. रामीरामदासांनीं आपली कुलकर्णकथा, त्यावर अध्यात्माचें रूपक करून जेथें सांगितली, तेथें, 'परिसा **भवपांडेपण** पदीं परमार्थ निरूपण । करितां श्रवण मनन । समाधान सकळिकां '॥११॥ अशी ओंवी आली आहे. (रामीरामदासांची कविता रामदास रा. दासी ४ पृ. ४९७) येथील भव–पांडेपण म्हणजे इहलोकाविषयीं वस्तुस्थितिलेखन, इहलोकीचें कुलकर्णपण. प्रस्तुतच्या पुस्तकांत ले. ५ मध्येंहि स्वतः घाटपांडे त्रिंबक शिवाजी हे सांगतात 'चौकी व चौत्रा यांचे पांडेपण' पहिल्या अंमलापासून आपणाकडे आहे, 'पांडेपणाचा हक–दस्तुर दुमाला स्वाधीन केला असे.' सारांश, लेखक, कुलकर्ण, पांडे हे तीनहि शब्द गांव–देश ह्या शब्दाला जोडून वा सुटे वापरण्यांत आले आहेत. पांडे वगैरे ह्या शब्दांचा 'लेखक' असा जरी अर्थ असला तरी नुसतें साधें लेखन करणारा असा तो लेखक नाहीं, त्यांत सत्ताधिकाराचा अंतर्भाव मोठा आहे. पांडे ह्या शब्दाप्रमाणेंच घाट ह्या शब्दाविषयींहि सांगितलें पाहिजे. घाट ह्याचे चार अर्थ आहेत. पैकीं डोंगरांतील मार्ग हा अर्थ येथें घ्यावयाचा आहे. घाट ह्याचा देश हा जो दुसरा लक्षणेनें आलेला अर्थ आहे तोहि येथें विवक्षित

नाहीं. वर पांडे म्हणजे लेखक हा शब्द जसा संतकवींनीं योजिल्याचें सांगितलें तसेंच पुढील ओवींत घाट–पांडे, व देश जुनंर इतकेंच नव्हे तर, बारा घाट व सत्तावीस पथकें ह्यांचाहि उल्लेख एक ओवींत आला आहे. मुक्तेश्वरी भारताच्या एका हस्तलिखित प्रतीच्या शेवटीं, प्रती–लेखकानें स्वतःचा निर्देश 'हें पुस्तक शुभ कल्याण। करावया सिवनारायेण। जुनंर देश **घाटपांडेपण**। बारा घाट सत्तावीस पथकें' ११९ ह्या ओवींत केला आहे. ( ऐ. सं. वाङ्मय खं. १ पृ. ९५ ). छापतांना 'देशघाटपांडेपण' असा देश शब्द घाटशब्दाशीं जोडून छापला आहे. व तसें गृहीत धरून अर्थ केल्यास देशावरील घाटमार्गांचा अधिकारी, हा एक अर्थ होईल. पण तशा अर्थाची अपेक्षा प्रस्तुत नाहीं. तसेंच एकाच अर्थाचे दोन शब्द जोडून वापरण्याची जी एक रीत–नामाभिधान ह्या-प्रमाणें– त्या रीतीस अनुसरून देश म्ह० घाट हे शब्द सजोड वापरले म्हणजे देशघाट–पांडेपण म्हणजे देशपांडेपणच असा दुसरा अर्थ सूचित होईल. पण तोहि अर्थ येथें घेण्याचें कारण नाहीं. कारण, ह्या ओवींत पुढेंच बारा घाट इत्यादि सांगितलें आहे. आणि इतर सर्व पत्रें आणि घाटपांडेपणाचें काम पाहतां, घाट म्हणजे डोंगरांतील वाट, हाच अर्थ घेणें उचित व अवश्य आहे. पण मग, पत्रांतून घाटपांड्यांना देशपांडे म्हणून प्रथम प्रथम म्हटलें तें कां व स्वतः घाटपांडे हेच देशपांडे म्हणून आपला नाम-निर्देश सही करतांना क्वचित् करीत आहेत ( ले. २–४ व ७ आणि २६ ) तें कां ? ह्याचें कारण 'देशपांडे' ह्या संज्ञेचा जो सर्वपरिचित गौरव व आदर तो लाभावा हें आहे. घाटपांडे ह्यापेक्षां देशपांडे ह्या संज्ञेची प्रतिष्ठ मोठी. ह्या ओवींत १२ घाट व २७ पथके असें म्हटलें आहे तेंच नेमकें प्रस्तुत पुस्तकांतील ले. ३३ मध्यें 'दुवज दह' म्हणजे २ + १० = १२ घाट व 'बीस्त हप्त' = २० + ७ = २७ 'चौकी पथकहाये' ह्या प्रकारें आलें आहे.

४. हें घाटपांडेपण प्रस्तुत पुस्तकांत आलेल्या घाटांपुरतें सांगावयाचें झाल्यास २० घाटांवरील अधिकाराचें आहे. ह्या घाटमार्गांमध्यें नेऱ्हांसह १४ खोरीं, १५ खिंडी आल्या असून १९ डोंगरी किल्ल्यांचा संबंध ह्या घाटाशीं आलेला आहे. तसेंच १६ नद्या आणि ३५ लहान मोठ्या गांवांचाहि संबंध ह्या मार्गाशीं जोडला गेला आहे. त्यांत १२ मोठाले 'उभे मार्ग' म्हणजे मुख्य रस्ते असून त्या मानानें इतर 'आड मार्ग' धरले आहेत. हिशेबी व्यवस्थेसाठीं ह्यांची विभागणी २७ महालांत केली आहे. खिंडी, खोरीं व गांवें लक्ष्यांत घेऊन तसेंच घाटांतील अडचणींचीं ठिकाणें, वळणें आणि जोडलेले रस्ते पाहून ३६ चौक्या ह्या रस्त्यांतून ठेवलेल्या आहेत. गांव–पांडे वा देश–पांडे आणि त्यांचे वरिष्ठ अधिकारी जसे पाटील वा देशमूख ह्यांची जशी सहकारी जोडी गांव–प्रांतांतून काम करतांना आढळते; त्याप्रमाणें ह्या घाटपांड्याना घाट–पाटील अथवा घाटदेशमूख म्हणून कोणी जोडीदार नाहींत. ह्याच घाटपांड्यांना देशपांडे व देशमूख म्हणून उल्लेखिलेलें आढळतें ले. ८.

५. घाटपांडे ह्यांचे सहकारी व अधिकारानें कनिष्ठ असलेले मोढवे, पानसारे व पथकदार ' हे तिघे आहेत ( ले २ ). ' बिडवई ' ह्या नांवाच्या अधिकाऱ्यांशीहि घाटपांड्यांचा संबंध येतो. वस्तुतः बिडवई हा बाजारपेठेंतील अधिकारी. शिवचरित्र साहित्य खं. १ ले. ४० मध्यें ' पेठेची व बाजाराची मामुरी ( भरभराट ) होण्यासाठीं महाजनास बिडवाई पाहिजे म्हणोनु विनायकभट ठकार यांस बिडवेपण देऊन ठेविले' असें आलें आहे. ह्या बिडवाईजवळ बाजारास येणाऱ्या व्यापारी कुळांची नोंद असे. कारण बिडवाईचें काम ह्या फिरत्या व्यापाऱ्यांचीं वाहनें जेथें सुटतात व कांहीं काल राहतात त्या तळाचें व तेथें आलेल्या व्यापाऱ्यांचें संरक्षण करणें हें असें. हेच व्यापारी घाटपांड्यांच्या घाटमार्गानें ये-जा करणार. म्हणून बिडवई व घाटपांडे ह्यांचाहि संबंध येतो व त्यानें म्ह. बिडवेनें आपल्या व्यापारी कुळांची यादी घाटपांडे यास दिली पाहिजे. ती देण्यासाठीं ले. ३ हा सरकारी हुकूम घाटपांडे यांनी मिळविला आहे. बिडवाईच्या वरचा अधिकारी सर-बिडवाई-ह्याचाहि उल्लेख ले. ३६ मध्यें आला असून तेथें त्यानें आपल्या धंद्यास साह्यता पाहिजे असें म्हटलें आहे. घाटपांडे यांचे दुसरे सहकारी, पथकी. बिडवे, सरबिडवे, पथकी, पानसरे इत्यादि हे सर्व आपआपल्या धंद्यास मिरासपण मिळावें, तेंहि एक वतन आहे असें म्हणून तसा कागद करून घेत. सनदापत्रें ह्या पुस्तकांत, ' सातारा व परळी ह्या तर्फेतील जकातीवर पतकी मिरासदार कोणी नाहीं; म्हणून ज्यांनी पंधरासोळा वर्षें जकायतीची कमाविसी केली आणि ज्याच्या भावानें ' ब्राह्मण होऊन शिपाईपणाची शर्त करून किल्ले सातारियास व परळीस तांब्राकडील लोकांनीं परीघ देऊन ते किल्यावर चढत असतां मारून काढून खाले घातले व शेवटीं स्वामीकार्यावरी तो भाऊ-गोविंद महादेव-खर्चहि जाहला; त्याच्या कृष्णाजी महादेव ह्या भावास-उपनांव गोडबोले-परळी व सातारा तर्फेकडील जकातीचे पतक सांगून ' पतकीचें वतन ' करून दिलें आहे ( सनदापत्रें पृ. २०१ ले. ५१ ). असे पतकी ह्या घाटपांडे यांचेकडे २४ आहेत. त्यांचा उल्लेख ' पथक मये गुजर ' असा आला आहे. म्हणजे ह्या पथकदारांचे पदरीं गुजर संरक्षक असत. ह्या पथकदारांनीं आपापले गुजर लोक घेऊन कोणच्या चौकीपासून कोणाच्या चौकीपर्यंत व्यापाऱ्यांस संरक्षण देऊन पोंचवावयाचे हें ठरलेलें असे. तो सर्व निर्देश पृ. २ व ३ वर आला आहे. बिडवे जसे व्यापाऱ्यांचे तळ-संरक्षक तसें हे पथकदार व पानसरे मार्गातील संरक्षक असत. ह्याच्याचप्रमाणें ' मोढवी ' हेंहि घाटपांड्यांचे सहकारी आहेत. पण त्यांचे नेमकें काम काय हें प्रस्तुतच्या पत्रांत कोठें आलेलें नाहीं. वाटतें कीं, हे मोढवी प्रत्यक्ष घाटमार्गाची तनदुरुस्ती राखणारे असावे. म्हणजे व्यापारी तळावर उतरले म्हणजे तेथल्यापुरती संरक्षणाची जबाबदारी बिडवाई यांजकडे; व्यापारी वाटचाल करीत असतां वाटेपुरती त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी पथकी पानसारे ह्यांजकडे आणि प्रत्यक्ष घाटमार्ग म्हणजे रस्ता दुरुस्तीचें काम हे मोढवी यांजकडे. मोढवे स्वतःचा निर्देश नाईक नायकवडी असा करतात ले. ७. ह्यावरून तेहि शस्त्रधारी असावे कीं काय असा संशय घेतां येईल. कानडी, फारसी, मराठी कोशांत हा शब्द आढळला नाहीं. असो.

६. ह्याप्रमाणें तीन चार सहकारी मंडळीसह घाटपांडे, परिच्छेद ४ मध्यें सांगितल्याप्रमाणें, त्या कालीं बऱ्याच लांबवर डोंगराजंगलांतून जाणाऱ्या मार्गावरील अधिकारी असल्यामुळें त्यांनीं आपल्या हाताखालीं मुतालिक किंवा गुमास्ते म्हणजे पेशकार नेमलेले असत (ले. २३, २५). ह्यांनाच अजहत असेंहि म्हटलेलें आहे. (ले. १९) घाटपांडे यांच्या ताब्यांतील रस्त्यांवर प्रमुख व आवश्यक त्या ठिकाणीं चौकी–चौत्रे असत हें वर सांगितलें. हे दोन्ही शब्द सारख्याच अर्थानें वापरले आहेत. तरी ह्यांत थोडा फरक आहे (ले. ५). चौकी ही रक्षणप्रधान व टेहळणी करणारी जागा आणि चौत्रा ही प्राधान्यानें वसूल करणारी जागा आहे. चौकी हि रक्षणप्रधान असल्याचें स. मा. रो. २ पृ. २९२ वर आलें आहे. 'वाणी खंडाळ्यास राहतात त्यास चौकीस असामी ३५ नेमून द्यावे.' घाटपांडे ह्यांचें काम रस्ते दुरुस्त राखून वाहतूक करणारांची सुरक्षितता सांभाळून त्यांजपासून त्याच कामाकरतां वसूल करण्याचें असे. हा वसूल माल वाहणारीं घोडीं, बैल, माणसें व त्यांच्या जवळील बाजारी वस्तु पाहून त्याप्रमाणें ठरावीक पैशाच्या रूपानें म्हणजे 'दाम' रूपानें व्यापाऱ्यां-कडुन घेतला जाई. असा वसूल २२ लक्ष दाम झाल्याचें ले. ३८ मध्यें आलें आहे. ह्या चौत्र्यांमध्यें मुख्य चौत्रा उंबरे गांवाचा असे. तेथील उत्पन्न ९ लाखा पर्यंत होत असल्यामुळें त्यास "नवलाख उंबरे" असें नांव रूढ झालें होतें (ले. ३३). अद्यापि तें रूढ आहे.

७. असें हें घाटपांडेपण पारनेरचे जोस–कुलकर्णी, उपनांव पोळ, ह्या घराण्यांतील शिवाजी गोविंद ह्या पुरुषास इ.स.१६३७ मध्यें 'नवें' मिळालें आहे. प्रथम जेव्हां हें काम ह्या शिवाजकिडे सोंपाविलें तेव्हां तें त्यांस 'घाटपांडे' असें नांव देऊन सोपविलें नसून देशपांडे असेंच नांव देऊन सोंपविलेलें आहे. म्हणजे नवें व स्पष्टपणें वेगळें काम आणि देशपांडे हें जुनेंच नांव. ह्यावरून वाटतें कीं, देशपांडे हें नांव अत्यंत लोकपरिचित व सर्वत्र रूढ असल्यामुळें, अनेक घाटमार्ग व चौक्या चौत्रे हाच एक विशिष्ट देशविभाग–महाल, खातें ह्याप्रमाणें–मानून त्यावरील अधिकाऱ्यांना देशपांडे हेंच पूर्वपरिचित नांव दिलें. आणि शिवाजी गोविंद पारनेरकर ह्यास घाटरस्त्यावरील प्रमुख अधिकार दिला. याच्या मुलांना मात्र घाटपांडे असें यथार्थपणें ओळखलें जाऊं लागलें. कारण घाटपांडेपणाचें काम देऊन १६३७ ते १६४३ पर्यंत आठ दहा वर्षें झालीं तरी ह्या मुदतींतील पत्रांतून शिवाजी गोविंद ह्यांचा उल्लेख देशपांडे ह्याच नांवानें झालेला आहे. शिवाजीचा मुलगा त्रिंबक ह्याचें नांव मात्र घाटपांडे ह्या अधिकारपदानें सांगितलें आहे (ले. ५). ह्याप्रमाणें शिवाजी व त्रिंबक ह्या पितापुत्रांचा देशपांडे व घाटपांडे ह्या अधिकारपदानें उल्लेख झालेला असला तरी त्रिंबक शिवाजी हा स्वतःचें नांव लिहितांना घाटपांडे ह्या हुद्याएवेजीं देशपांडे हाच हुद्दा लिहीत असे (ले. ७) हें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. म्हणजेच देशपांडे ह्या अधिकार–पदाचें महत्त्व मानलें जात असे.

८. घाटपांडे हा अधिकार इ. स. १६३७ मध्यें पुनः नवा करून तें काम चालूं केलें असलें तरी 'नवें' करण्याचा प्रसंग कां आला हेंहि ध्यानीं घेतलें पाहिजे. इ. स. १६३०–३६ ह्या अवधींत निजामशाहीमध्यें जी विस्कटाविसकट झाली; तींत म्हणजे १६३० मध्यें निजामशाहीच नष्टप्राय होते, तिचें पुनरुज्जीवन शहाजी राजे भोसले करतात; राजधानीहि वेगळीच बनते व शेवटीं १६३६ मध्यें निजामशाही पूर्णपणें नष्ट होऊन तिची वांटणी दिल्लीकर व विजापूरकर पादशाहींमध्यें होते; ह्या राज्यक्रांती-च्या गडबडींत 'लव्हाळे–वृक्ष–पुरन्याया' प्रमाणें पानसारे वगैरे छोटे अधिकारी राहिले, पण घाटपांडे हे जे वरिष्ठ अधिकारी ते नाहींसे झाले. म्हणून शिवाजी गोविंदास 'नवे देशपांडेपण' दिलें. पहिली व्यवस्था बिघडल्यामुळें काहीं काळ घाटमार्गहि बंद पडले; जे थोडे मार्ग वाहाते राहिले त्यांची नेमणूक वेगळ्याच गांवाखालीं होऊं लागली, आणि अर्थात् हे जे छोटे छोटे अंमलदार आपल्याच ठिकाणीं काम चालूं ठेऊन वसूलयादी-पत्रक पुरतें न बनवितां किंवा वरिष्ठांकडे न देतां आपणच वसूल घेऊन तो जिरवूं लागले; तेव्हां नवे अंमलदार नेमून, सर्व घाटचौत्रे चालू करून, यांची यादी करून, वसूल–पत्रकें वगैरे सर्व घाट–दप्तर नीट एकत्र ठेवणें इत्यादि करावें लागलें व त्यासाठीं जुन्याच्या जागीं नव्या अधिकाऱ्याची योजना केली व ते हे नवे शिवाजी गोविंद घाटपांडे. ह्यांचें प्रस्तुत छापलेल्या पत्रांत पहिलें पत्र इ. १६३८ मधील आहे. आपलें हें नवें पद सांगून नवेपणामुळें उद्भवलेल्या तक्रारीच त्यांत त्यांनीं सांगितल्या आहेत. साहेबीं आपणास 'नवे देशपांडेपण' दिधले आहे; (परंतु) आपणांसी पथकी पानसारे, मोढवी (आपापले) कागद महिनियाचे महिनिया दखल करीत नाहींत, आपल्या हक्काचरावरी (आमचा) हक घेऊन पाठऊन देत नाहीत, हक लेहोतु मागतो ते पानसारे देत नाही, बाजे हकदार हक घेताती तोहि व बिडवाई कुलारग दखल हो देते नाहीं; उंबरे चौत्रा मालसेज संमते खालीं जुनरींचे देशपांडिये व स्याबीखान जागिरदाराचे कारकीर्दींत घातला तो त्या संमते खालून दुरी करून पहिल्याप्रमाणें उंबरेखालीच दिधला पाहिजे (ले. २, ३, ४). ह्या तक्रारीं वरून त्याला त्याचें कनिष्ठ अंमलदार मानीत नाहींत; आणि हा नवा अमलदार आहे, हें स्पष्ट कळतें. ह्या नव्या अंमलदाराचा जमहि जुने व खालचे लोक बसूं देत नाहींत हेंहि कळतें. शिवाजी गोविंद यास आपला अंमल नीट बसविण्यास पांच सहा वर्षें लागलीं आहेत. त्याच्या मुलापासून म्हणजे त्रिंबक शिवाजी पासून मात्र हें गाडें नीट चालूं झालें; कांहीं घाटांच्या दुरुस्त्याहि ह्या त्रिंबकरावानें केल्या, घाटपांडे हा हुद्दाहि रूढ झाला.

९. इतकें होत आहे तों इकडे शिवाजी राजांच्या अंमलास प्रारंभ होऊन पहिले दोन दशक संपून अफजलप्रकरण होऊन गेलें होतें व मोंगलांकडील एक एक वजीर दक्षिणेंत येऊं लागले. ह्या धामधुमीचा परिणाम पुनः ह्या घाटपांड्यांच्या व्यवस्थेंत बिघाड होणें हा झाला. एकदां करोडीच्या म्हणजे जकातविरील गुमास्त्यांना, 'ही बाब खालसापैकीं आहे"

असें कांहीं सांगून, बंदिखान्यांतच घातले गेले व त्याबद्दल त्रिंबक शिवाजीनें महजर करून कळविलें आहे ( ले. ७ ). ह्या धामधुमींत दुसरें असेंहि होऊं लागलें कीं, नाणेघाटांतल्या चौकीवर जी जकात घ्यावयाची ती हा त्रिंबक शिवदेव घाटपांडे, नाणे-घाटाच्या अलिकडे जुन्नरांतच बसून घेऊं लागला. व हीहि तक्रार करण्याखारखीच गोष्ट होती. म्हणून सिवाजी राजांच्या सुभेदारानें-राघोचलाळ अत्रे-' मधेच बसोन बकालास रंजीस करतां हा काय माना आहे ' असें जरा दरडावून लिहिलें व समक्ष भेटीसहि बोलाविलें ( ले. १० ). ह्यानंतर ह्या घाटपांड्यांचीं संभाजी राजाराम छत्रपती ह्यांच्या राजवटींतील पांच पत्रें असून इ. स. १७०८ नंतरचीं पत्रें सुरू झालीं व तींच अधिक आहेत. त्यांत बाळाजी विश्वनाथ, थोरले बाजीराव यांचीं पत्रें आलीं आहेत. त्या पत्रांतून बाळाजी विश्वनाथ यांना भेटण्यास ह्य शिवाजी त्र्यंबक घाटपांडे सातान्यास गेला होता ( ले. २१ ); व मोगल व मराठे ह्यांमधील दुही वारोन धामधूम थांबली आणि ' स्वामीचे मुलकाची आबादानी आपण करविली आहे ' असें तेथें सांगोन त्यानें आपल्या वतनाचा व जकातीचे दराबद्दलचा करार करून वतन वंशपरंपरा चालविण्याचें पत्र आणिलें. पुढें हे घाटपांडे व त्यांचे मुतालिक आणि प्रत्यक्ष पुत्र ह्यांत वितुष्ट उत्पन्न झालें. म्हणून बाळाजी विश्वनाथांनीं मुतालीक नरसो कुकाजी यास व थोरल्या बाजीरावांनी त्रिंबक शिवाजीस पत्र लिहून ' घाटपांड्याचे आज्ञेखेरिज चेकजरा वर्तणूक न करणें ( ले.२३ ) व ' त्रिंबक घाटपांडा बोरघाटी आहे त्यास बाप शिवाजीस कुमक करण्याबद्दल ताकीद करविली आहे.

१०. घाटामधील जकाती हा स्वतंत्र महाल समजून त्यावर स्वतंत्र ' सभासद ' नांवाचा अधिकारी असे आणि त्यांजकरवी रहदारींविषयीं लष्करी सरदारांस ' वाणी लोकांस उपसर्ग न द्यावा' म्हणून 'वाणियांस परमुलखी पाठवावयास अभयपत्रें' 'जकातीचे पथकियास गावांत जागा देऊन जकाती सुरलीत ' चालती करावयाबद्दल शेट्ये महाजन यांना पत्रें पाठविलीं जात ( ऐ. सं. सा. खं. ४ ले. १५–१७ कल्याण भिवंडी इ.१७०३) दोन जकाती ठिकाणच्या वेगवेगळ्या घेत. घाट–जकात वेगळी आणि बाजार–किंवा पेठ–जकात वेगळी. बाजारपेठ जकात निरनिराळ्या वस्तूंवर जशी घेत – हे १०० जिन्नस सांगितलेले आहेत ले. ९१९ शि. च. सा. खं. ५ – त्याप्रमाणें घाट–जकात इतक्या बारीक वस्तू पाहून त्यांवर घेत नसत. घोडे, गाढव, बैल, खांदाडे, डोई ओझें म्हणजे सिरभारी, गोणी, दिंडे, कापड–बगी अशा ठोक मानानें घेत; तरी त्यांत भुसार माल, बंदरी माल, कापडमाल, कडबा गवत, ह्या पद्धतीनें घाट – जकातीचा आकार आकारला जाई. त्यांत ' देसी परदेसी ' असा भेद केला आहे. घोडियास निमे, गाढवास तिजाई, खांदाडी मोटलेकरी देखील सिरभारी यास चौथाई जकात रखवाली म्हणून घेत. ' देसी परदेसी ' हे शब्द जेथें वापरले आहेत तेथेंच ' आपल्या माहालावरून परमाहालास जातील व परभारे घाट उतरोन जातील त्यास ' असेंहि सांगितलें आहे. म्हणजे देशी परदेशी शब्द आपला महाल आणि आपला नसलेला महाल, तसेच बंदरी माल ह्यासाठीं

योजलेले दिसतात. तह–करार–मदार ह्या ग्रंथांत घाटचे व कोकणचे जिन्नस असा फरक केलेला आहे पृ. ११२. तेथेंच पेशवे आणि कडपेकर नबाब असा दुअमली जकातीचा भाग आणि बालाघाट व पाइन घाट म्हणजे वरघाट–तळघाट ह्या भेदानें सांगितला आहे पृ. ९४. कांहीं प्रसंगीं घाटांमधून मेटामेटावर दिवाणचे चाकर रखवालीसाठीं ठेवले असत. त्याबद्दल हक्क वगैरे कांहीं जकात घ्यावयाची नाहीं असें सांगितलें आहे. शि. च. सा. ५ ले. ७७१. तसेंच घाटांमधून ज्या देवता असत त्यांचा म्हणून आकार क्वचित् वेगळा घेत व तो त्या देवतेकडे खर्च करीत. पारघाटीं श्रीवरदायीनी म्हणजे श्रीरामवरदायिनी देवता आहे तीस दर बैली एक रुका घ्यावा असें सांगितलें आहे. त्याच घाटावर मालाप्रमाणें दोन रुक्यांपासून बारा रुक्यांपर्यंत घाट–जकातीचा आकार घेत. ह्या घाट–जकाती पुढें पुढें मखत्यानें व पांच वर्षांच्या मुदतीनें देत. ह्या मखता–करारांत सरकार व मखतेकरी एकमेकांस कसे बांधून घेत म्हणजेच सोडवणुकीचे कलम त्या करारांत कसे घालीत तें पाहण्याजोगें आहे. ‘ सालमजकुरीं सान्या फौजा देशीं आहेत व पिकाचें भरसाल, त्या-अर्थीं घाटमार्गाची आबादानी मातबर चालेल. ’ अर्थात् व्यापारी वाहतूक ठीक चालून किफायत होईल ती कच्चा हिशेबासह सरकारांत समजवावी. अधिक होईल तें समजून सरकारांत घेतले जाईल. ’ हें सरकारानें मखतेदारांवर घातलेलें कलम. ह्याच्या अगदीं उलट मखतेदारानें सरकारावर बंधनात्मक कलम असें घातलें आहे. ‘ तीर्थस्वरूप दादा-साहेब वगैरेंच्या फौजा येऊन घाटमार्ग बंद झाला तर उणाव पडेल ती रकम सरकारी मखत्यांत मजुरा पडेल ( कित्ता ). जकात जसी ज्या त्या चौऱ्यावरच घेतली पाहिजे ‘ अलिकडे बसून घेणें हें मधेंच घेणें होतें तें करूं नये ’ म्हणून शिवाजीच्या सुभेदारांनीं जसें ह्या घाटपांड्यांना सांगितलें त्याचप्रमाणें थो. बाजीरावांनीं तळेगांवच्या महाजनांना सांगितलें कीं, तुम्ही उभ्या मार्गाच्या वाणियाच्या खंडणीस येतां ते येकंदर न येणें ( ले. २८ ). म्हणजे बाजारपेठेपुरता सेटे महाजनांचा अधिकार; त्यांचा मार्गाशीं संबंध नाहीं. कांहीं वेळां दाणी–व्यापारी यांना, ते आपल्या घाटानें आल्यास जकात–उत्पन्न आपल्यास मिळेल म्हणून थोड्याशा जबरदस्तीनें दुसऱ्या घाटानें जाऊं देत नसत. ह्याबद्दलहि तसें न होऊं देण्याबद्दल आज्ञा केल्या आहेत ( स. मा. रो. २ पृ. २९१ ).

११. व्यापारी लोकांची काळजी, शेतकरी कुळांबद्दल तीं कुळें गांवांतून जाऊं नयेत ह्या बद्दल जशी घेत, त्याहून अधिक घेतली गेली आहे. इ.स.१६५४ मध्यें सिराळे येथील शेट्ये महाजन, बकाल वाणी व्यापारी आणि डांगी पतकी ( तुकाजी व दत्तो विश्वनाथ ) यांस, सुखानें ह्या मार्गें तुम्ही या, क़सलाच उपसर्ग पोचूं देणारी नाहीं असें अभय देतांना चंद्रराव मोरे राजे ह्यांनीं सांगितलें कीं **‘ तागसडा गमावला तरी सोनेचा करून देऊनु** ( शि. च. सा. खं. ५ ले. ८३९ ).

**१२.** ह्या पुस्तकांत भाषादृष्टीनेंहि कांहीं शब्दप्रयोग लक्ष वेधणारे आले आहेत

'तुम्ही, आमचे आप्तविषई भाऊबंद याहून अधिक **कामाची तिडिक** धरितां '(ले.१८). असाच शब्द ले. ४१ मध्यें 'तुम्ही आमचे जे स्वहित असेल तेच कराल ( कारण ) आमचे **तिडकी** म्हणवीत अलां ( पृ. २८ ) ह्याच शब्द थो. छत्र० राजाराम यांच्या पत्रांत '**पोट–तिडिक**' असा आला आहे. खं. १५ 'परवाना–पत्र' ह्या कागदाचें कार्यहि ले. २ व ४ मध्यें वेगळें सांगितलें आहे. बरोबरच्या सहकारी व किंचित् कनिष्ठ अधिकारी मंडळीकडून कामें करवून घेण्याचा परवाना.

**१३.** राजकीय दृष्टीनें ह्या घाटपांडे कागदांत पुढील उल्लेख आले आहेत. पारघाट जावलीचे माथा पर्यंत आदिलशाई हद्द ( पृ. २ ); शिवाजी राजे जयसिंहाचे पंजांत सांपडून आग्न्यास जाऊन येईपर्यंत 'पातशाही करोडीच्या लोकांस, अंताजी खंडागळ्यानें चाकण किल्लेदाराकडील लोकांच्या साह्यानें, पकडून बंदीखान्यांत टाकले आणि सांगितलें कीं, इंदोरी हा खालसा महाल; तेथील जकात उत्पन्न आपण घेणार (ले. ७ ); इ. १७१८ पूर्वी गनिमानीं जुन्नर शहर मारिल्याचा तेथील माहाजनकी विक्रींत निर्देश ( २० ) आहे.

**१४.** ह्या शिवाय, पोषाख प्रकार ( १८ ), वकील (१६,१८), स्त्रियांची नांव लिहिण्याची रित ( १७,२० ), सरकारी मायन्यांत अपूर्ण उल्लेख असल्यामुळें अंमलबजावणींत व्यत्यय ( २६ ), गुमास्ताकाम व तोच पुढें घाटपांडे बनतो ( २४–२६ ), घाटपांडा न बदलावा म्हणून शंभर लोकांच्या संमतीचें पत्र ( ३४–३५ ), जकातीचे दर ( ३१ ) व वसूली ( ३–१९,३८ ), घाटपांड्यास हजर करणारासहि हजर करणाऱ्यांची जामिनकी, पानसारागिरीचें काम व त्या वतनाची विक्री ( १२,२५ ), घरास आग ( ८ ) इत्यादि इत्यादि माहिती आली आहे ती अभ्यासकांस उपयुक्त होईल.

**१५. संकीर्ण** ह्या सदराखालीं ४७–८७ लेखांकांत जीं पत्रें ह्या पुस्तकांत छापलीं त्यांतील विषयविवेचन आणि त्यामुळें इतिहासाच्या निरानिराळ्या भागांत पडलेली भर सांगण्यास स्थलकालाभावीं आतां सवड नाहीं. पत्रावर दिलेला मथळा, पृष्ठावर केलेला विषयनिर्देश, ह्यायोगें तें काम थोडेसें भागेल. तरी श्रीतुकाराम महाराजांचे चरित्रांत ज्यांचा निर्देश येतो त्या रामेश्वरभटांचे संबंधी, त्यांच्याच घराण्यांतून मिळालेली माहिती (ले. ८५–८७), प्रसिद्ध चिंतो विठ्ठल रायरीकर जोशी सरदार ह्यांचा जन्म–मृत्यूकाल (ले. ६३–६६), जेजुरीच्या मल्हारीमार्तंडास हत्ती वाहण्याची चाल व पेशवे प्रधान ह्यांचे तेथील पुरोहितत्व (ले. ५३–५८), हैद्राबादकर रायारायान् धोंडोपंत यांना किल्ल्यांत बंदिवान असलेल्या जनकोजी शिंद्याचें पत्र (ले. ७९), टिपूवरील स्वारीसंबंधी बातमीपत्रें (ले. ६७–७२), नारोराम मंत्री यांनीं वांई येथें भीमेश्वर देवाची केलेली स्थापना (ले. ४९), समशेर बाहाद्दरची गुडगडी व दागिने–खर्च यादी; भोरकर पंतांची नागपूरकर भोसले यांजकडील सचिवी ले. ५९, इत्यादि इत्यादि नवीन माहिती त्या पत्रांतून आली आहे एवढें सुचवावेसें वाटतें.

**१६. तोतया**– महाराष्ट्रेतिहासांत तोतये अनेक झाले. आणि राजकारण प्रसंगार्थ; म्हणजे राजव्यसन–प्रतिकारार्थ 'राजव्यंजन' = तोतया, वेळीं निर्माण करावा, असें, मौर्य चंद्रगुप्ताचा सुप्रसिद्ध अमात्य जो चाणक्य किंवा विष्णुगुप्त ह्यानें आपल्या अर्थशास्त्र ग्रंथांत (इ. स. पूर्व २ ह. वर्षें) अध्याय ९६ मध्यें प्रारंभींच सांगितलें आहे. प्रत्यक्ष तसा तोतया निर्माण केल्याचें उदाहरणहि आहे. नंदराजाचा प्रधान शकटाल ह्यानें नंदराजाच्या मृत्युकाळीं बातमी फुटूं नये, बंडाळी उद्भुत होऊं नयेत ह्यासाठीं नंदासारखा दिसणारा जो इंद्रदत्त त्याला नंदराज बनविले आणि खऱ्या नंदराजाच्या मृत्यूनंतर कांहीं काल ह्या इंद्रदत्ताला नंदराज म्हणून पुढें करून राज्यशकट चालविलाहि. पण हे तोतये आपत्ति–निरसनार्थ आहेत. आणि मराठी राज्यांतील तोतये आपत्ति निरसनार्थ नाहींतच निमंत्रणार्थ व प्रसरणार्थ झालेले आहेत. त्यांतील अमृतराव व येश्वदाबाई ह्या पेशवेव्यक्तींचे तोतये होत. त्यांसंबंधीची पत्रें ले. ७५–७६ हीं आहेत.

**शेवटीं** ह्या पुस्तकाचें काम इतक्या घाईत म्हणजे अवघ्या वीसपंचवीस दिवसांत पूर्ण होऊन आज प्रकाशित होत आहे ह्याचें श्रेय आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक पटवर्धन व त्यांचे सहकारी ह्यांजकडे आहे हें सांगणें भाग आहे. त्याचप्रमाणें सूची वगैरे करण्यास श्री. स. रा. खरे ह्यांचीहि मदत झाली. श्री. च. द. आपटे व श्री. एरंडे ह्यांचीहि मदत झाली हें निर्दिष्ट केलें पाहिजे. ह्याहिपेक्षां ज्या श्री. कृष्णाजी गोपाळ घाटपांडे जुन्नरकर ह्यांनीं हे कागद मंडळाकडे दिले त्यांना सर्व इतिहासभक्त महाराष्ट्रीय धन्यवाद देतील हें उघड आहे. मंडळांतील मंडळींचें साह्य झालें हें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

पुढें दिलेल्या घाट–वाटांस नकाशाचेंहि सहाय्य देतां आलें असतें तर तें फारच फार अवश्य होतें. तसा थोडासा प्रयत्नहि केला. पण एकाकी असलेल्या मला तें उरकलें नाहीं खरें, घाटवाटीहि तशी पुरती नाहीं. पण जरा पुढला उपक्रम ह्या दृष्टीनें ती दिली आहे.

सर्वांचे आभार मानून प्रस्ताव पुरा करतों.

आश्विन वद्य ६
शक १८७५

**शंकर नारायण वत्स जोशी**

# घाट मार्ग–यादी

प्रथम योजिलें होतें कीं, बा. चा. रो., थो. माधवराव रो. भाग २ पृ. ८०, स. मा. रो. २ पृ. २८५ ( ह्या दोन्ही रोजनिशींतील घाट एकच आहेत ). प्रस्तुत घाट-चौक्या हें पुस्तक, शि. च. सा. व ऐ. सं. सा. खं. ह्यांमधून जकाती संबंधानें आलेलीं पत्रें, तहकरारमदार, हिंगणें दप्तर, पे. द. ह्या ग्रंथांतून तसेंच श्री. स. आ. जोगळेकरकृत सह्याद्रि पृ. ६८–७०. इन्टिनरी ॲन्ड डिरेक्टरी फॉर वेस्टर्न इंडिया ( इ. १८२६ ) पृ. १४४–४९; व ज्ञानकोश प्रस्तावना भाग १ पृ. ४६२–४६४ इत्यादि ग्रंथांतून जे घाटमार्ग दिलेले आहेत व जेवढे वाचतांना मी नोंद केला त्यांची वर्णानुक्रमानें नामें देऊन त्यापुढें सह्य, सातपुडा व विंध्य ह्या पर्वतराजीपैकीं ज्या पर्वतांतील तो घाट त्याचा, संक्षेपानें स, सा. विं. असा उल्लेख करून, नंतर ग्रंथनाम व पृष्ठ, त्यापुढें त्याची पायवाट, घोड–वाट ( घोडी बैल वगैरे जनावरें जाण्याची वाट ), गाडेवाट, सैन्यवाट असा किंचित् तपसील द्यावा. पण शेवटीं प्रारंभीं–म्हणजे मुख्य ग्रंथाच्या शेवटीं लिहिली जाते पण ग्रंथप्रारंभीं जोडली जाते त्या प्रस्तावनेला ही यादी जोडावयाचें योजल्यामुळें 'आतां वेळ व जागा नाहीं, विशेषत: छपाईच्या बिलांत वाढ होईल' हें ध्यानीं आणून देतांच, नकाशाप्रमाणें तशी घाटयादी देण्याचें–कांहीं चिठ्या व आंखणी–नकाशासाठीं केली होती तरी तें–सर्व रद्द करून येथें फक्त अकारादि क्रमानें घाटांची यादी देण्याचें केलें आहे.

घाटनांवांची यादी करतांना हेंहि लक्ष्यांत आलें कीं नांव खरें कोणचें ? एकाच घाटाला दोन दोन चार चार नांवें कोठें कोठें दिल्याचें आढळलें; तसेंच मोडी वाचतांना ह–द–प–ई; ज–न इत्यादि अक्षर वाचतांना उत्पन्न होणारा दोष, मुळांत व–च्या जागीं उ–औ–ह ( आउपा, आहुपा, आवपा घाट ) इत्यादि जुना लिहिण्याचा प्रकार; तेव्हां घाटाचें खरें व नेमकें नांव कोणचें व जर दोन तीन नांवें एकाच घाटाचीं येतात तर हीं तिन्ही नांवें अकारादि क्रमयादींत तिन्ही ठिकाणींहि पालटून दिलीं पाहिजेत. तळघाट व वरघाट असे दोन घाट प्रकार येतात. शिवाय ह्याच दोन स्वतंत्र मुख्य नांवाचे पोटांत इतर घाट पेशवे रोजनिशींत वेगळे दिले आहेत. म्हणजे घाटनांवापुढें हाहि भेद दर्शित केला पाहिजे. कांहीं घाट चढून गेलें कीं लगेच उतरावयाचे नाहींत. तर माथ्यावर खूप मोठें सपाट मैदान व तेथें वसती गांवें असतात. अशा वेळीं देश हें नांव घाटाला मिळालें. ह्यावरून तें कोणी रूढ केलें ह्याची कल्पना येते. घाट चढतांना व उतरल्यावर दोन्ही पायथ्याशीं जीं ग्रामनामें येतात त्याचें नांव घाटाला देण्याची एक रीत–( कांहीं नांवें गुणावरून पडलेलीं आहेत–रडतोंडी, बोचेघोळी इ.) ह्यामुळें एकाच घाटाला दोन नावांनीं ओळखलें जातें. म्हणून नांवें निश्चित करणें, हें प्रवासाशिवाय वा

तत्तद्वासीयांच्या विश्वसनीय माहितीशिवाय येथें बसून, कठीण. बरें, अशा एकाधिक कारणामुळें येथें कांहींच न देणें हेंहि बरें नव्हे. म्हणून सुटी व कांहीं घाटांचीं नामयादी देत आहे.

हा सर्व घाईचा भाग आहे. 'असें योजलें होतें ' इत्यादि लिहिणें हींहि एक सोयीची पळवाट ह्या घाटमार्गांचे वेळीं मीं काढली असें वाचकांच्या ध्यानीं येईल हें माझ्याहि ध्यानीं आलें. पण घडलें तें येथें प्रारंभींच सांगत आहे. साधन ग्रंथाला स्थल–व्यक्तिनाम सूचीप्रमाणें विषयनाम सूचीहि जोडण्याची माझी इच्छा. त्यासहि येथें आतां मार्ग नाहीं. क्वचित् आलेले ग्रंथ संक्षेप वाचकांच्या ध्यानीं येतीलच.

अकरौनी घाट ( सा )
अजिंठा ( विं ) पे. द. २०–२९५
आव्हाटा ( स ) घा १, १६, २२, २३
आणस्कुरा ( स )
आमपा–रणसील (स) घा २५
आव–ऊ–ह–फा( व कोटी ) ( स ) मारो २–८०, समारो २–२८६
औफत ( स ) घा १०
अंचा ( स ) घा २
आंबेपारणसील (स) घाट २, १६, २५
आंबवली ( स ) घा १६
आंबेनळी ऊर्फ रडतोंडी ( स )
आंबोली अथवा पारपोली ( स )
आष्टमी–हिरडीचा घाट ( स ) घाट २
आस्वलीचा घाट (स) शिवसा ३ ले. ४०३
इवोटा बारी ( विं )
उंबरा गुमार ( स ) पायघाट
उंबरे नवलाख चौत्रा (स) घा १, २ मारो २–८०
उंबर्डे ( स )
उत्तर तिवरा ( स )
कटिलनाथ–पिंप्रि–परदरी ( स )
कतिचोरी ( सा )
करवंदा ( स )
कलेढोणे ( स )
कसूर ( स )
काजर्दा ( स )
कामती व दोवली ( स )
कामथा ( स )
कावळ्या ( स ) घा २, १५, २५
कांचन–मंचन ( स )
कासारी कासारबारी ( विं )
कुती चोरी ( सा )
कुटे ( स )
कुवलचंद्र–नाकिंदण्या ( स )
कुसुर ( स )
केळ ( स )
कोकणदरवाजा ( स )
कुंडी–कोंठी–कोंटी ( स )
कुंभ, कुंबा–भा ( स ) घा २
कुंभारली ( स )
कोंडाई बारी ( स )
कोपोली खोपवली ( स )
कोल्हा ( स ) समारो. पायअमल तळघाट
कंळबो ( स )
कौलाचादर व नाकिंदादर ( स )
खोपवली तर्फ बोरेटी ( तळघाट ) ( स )
गडउमर अथवा गोमार घाट ( स )
गणेश घाट ( विं )
गोवताला ( विं )

गाढवलोट (वरघाट) (स) घा. २,
  १२,२५
गिरनार बारी आणि जारीबारी (विं)
गोप्या (स)
गोवेली (स)
गुंजालियाचा घाट पे. द. २०-१३२
गुंडा गोंडा व आन्हटा (स)
गोंद्दे (स)
गोवेली घाट (स)
घोटगे, घोटगीचा (स)
चंद्रे (स)
चांदवड (स) पेद १०
  ले. ९२
चांदोरी घाट (विं)
चोंडा मेंढा घाट (स) घा.१, १६, २५,
  २९ मारो २-८०, समारो २-२८६
छत्री किंवा छत्रपती (सा)
छचला (सा)
छादसली-सेदसली (सा)
डोईफोडी तर्फ देहर (स) थो. मा रो,
  २-८०, स. मा. रो. २-२८६
डोलेघाट (स) बा. बा. रो. १ पृ.२६९
ढवळ्या, ढवळा अथवा कामठा घाट (स)
ढाककुसूर घाट (स)
तकिया (स)
तलघाट (स) घा. १,
ताम्हण ताम्हाणे, देवस्थळी आणि थिव
  घाट (स)
तिन्नई घाट (स)
तिवरा उत्तर व दक्षिण (स) घं २
तैल बैला (स) घाट २
तोरण घाट (स)
थळ घाट (स)

दानद घाट (स) घा. ८
दुदया बाबाचा घाट (सा)
देऊळ घाट (सा) पेद. २५ ले. १८४
देव घाट चांदा (स) घा. २
देवलिया हिंगद १-३
धाडसरचा घाट (स) शिचसा १-५८
धारूरचा घाट (स) पे. द. २५-२५४
धुलीबारी, फर्ली फरोलीबारी (सा)
नमतेचा घाट (सा)
नरदावा घाट (स)
नाना, नाणे, नाणा (स) घा १
न्हावी (स)
निसणी (स)
पलू (स)
पारघाट (स) शि. च. सा. ५ पृ. १५
  घा. पृ. १, २
पारनेर हिंगणें द. १-६७
पिंडवल बारी (स)
पिंप्री अथवा पिप्री भोर घाट, (स)
पिंपळगाव घाट (विं)
फर्दापूर-अजिंटा (विं) पेद १०-३८
फोंडा अथवा पोंडा घाट (स)
बरवन अथवा सुकलदेवी घाट (सा)
बापदेव घाट (स)
बाभुळणा घाट (स)
बालाघाट (विं)
बावडा घाट (स)
बोपी अथवा बोरपाघाट उर्फ गोपचा
  घाट (स)
बोरघाट उंबरे व कुरवंडा (स) (वरघाट)
  घा. १, २
बोरघाट खोपवली (स) (पायअमल)
बोरंदापाय (स)

चोवरा बारी घाट ( विं )
भीमाशंकर ( स )
भोपेघाट ( स )
मोर वा बोर ( स )
मळा घाट ( स )
मढ्या घाट ( स )
माळसेज व साखरं ( वरघाट ) (स) घा. १
मुलाघाट ( स )
मंगरूळ–वरघाट ( स ) पेद्‌ २५ ले २५५
मेंढा मेंढा ( स )
मेंदरगी मेंदी ( स ) पे. द. २१–१२७
मोरकंडा ( मोर कुरा ) ( स )
रणसील अथवा भीमाशंकर घाट ( स ) समारो; २–२९६ मारो ८०
रांगणा घाट अथवा प्रचीतगड घाट ( स )
राजघाट ( स ) घा. २, १६, २५
राजबारी ( स )
राजमाची ( तळघाट ) ( स )
राजापूर घाट ( विं )
रामघाट ( स )
रेवताबारी ( विं. )
राहुरा रौरा ( स )
रंजनघाट ( विं ) पायवाट
लरसिंगी घाट ( विं )
लाखणवाड्याचा घाट पे. द. २०–२२२
लिंग्या–लेंडी तामनदेव ( स )
वडालाबारी, काचीन बारी, आणि मार्किंडा–बारी ( विं )
वरंधा घाट ( स )
वलण रंगार घाट ( स )
वलतीचा घाट ( स ) घा
वाघजाई ( स )
विशाळगड घाट ( स )
सवाण्णी–गाढवलोट ( स )
सती घाट ( स )
साद्रे घाट ( स )
साय, नागजाई ( स )
सालपा ( स ) शिवसा १– ४०, ५८
सावरगांवचा घाट ( स ) पेद्‌. २५ले२२६
सावळ–ळा ( स ) मा. रो. २–८० घाट २
सावळा कुसूर ( स ) ( पायअमल )
सावाघाट ( स ) ( वरघाट ) घा २
सिद्‌गड घाट ( स )
सिंद्‌वा घाट ( सा )
सीर घाट ( स )
सूल घाट ( विं )
सेवघर घाट ( स )
शे–से–वता घाट ( स ) घा १
सेवती व मरी घाट ( स )
सोमताना घाट ( विं )
सोल ( विं )
हडगर ( स )
हणमंत–तलकट घाट ( विं व स )
हरिश्चंद्र बालाघाट ( स ) घा. १
हात लोट घाट(स)शि. च. सा. ५ ले.१५
हांडियाघाट हिंद १–३८, ४०
हिरडीचा घाट ( स ) घा. २
हुंबे मेट

वरील यादींत सातपुडा १०, विंध्य १८ व सह्य पर्वतांतील १२५ आणि इतर ८ असे एकंदर १६१ घाट आले आहेत.

---

मराठी राजवटींतील कांहीं घाटमार्ग व चौक्या-संकीर्ण

# अनुक्रमणिका

# मराठी राजवटींतील
# कांहीं घाटमार्ग व चौक्या

## जुन्नर-घाटपांडे

ले. १ जुन्नर-घाटपांडे

श्री

श. १५५१ अंदाजें
इ. १६३०

यादि दास्त हकीकत व मारफात कान्होगोह सुबे खोजस्ते बुनियाद घाटहाये मचे दारी व पथकहाये बमये गुजर तालुके पा **मालसेज उबरे** ना सार जुनर वगैरे बा हसलि नमक क्षार वगैरे मुतालुके दरया अमल खालसे शरीफे अज हद **पारघाट** सेवेता मुा **निरा कृष्ण** ताहद **तलघाट आव्हटा** मुा गगा बिा जेल मो चौकी ३६

कल्याण भिवडी २
सुपा रेहवण २
आस्टमी नागोटणे २
पेनवासी पनवेल २
दडा राजपुरी चेऊल २
वासुदरी थल्या व माहीम तलोजे २

खुा आमदनी बदर मार ना फिरगन वगैरे कदर दरियाव

ता

चौत्रे घाट **मालसेज** मये गायेदरा ता मडखोराचे माथा मुा किले **सिहोला** व **हरीचधर बाला घाट पाइन** तलकोकण १

आडनये

घाट **चोढामेढा** मये बारी म्हैस-वलण **राजूर** तपे व वाणगौचे माथा मुा किले **रतनगड** पाभार थुलगकुरग पाइन तलकोकण मये पथक २

घाट **नाना** मये दारे पाइनी ता **कुकडन्हेर**चे माथा निजिक किले **जीवधन** व नीमगिर हडसर चाउड मुा पाइन तलकोकण १

नदी **कुकडी**

तलघाड बोरघाट व आव्हाटा घोटी व मसरुली खोराचे माथा ना किले **मदनगड कुरग व भाजगड त्रिबक** वगैरे मुा तलकोकण २

( कागदाचे मागे )

वाके जिले **आकोले** नदी **पेहरा** घाट **आवे** पारणसील ता। **आवेगावचे** माथा व **भीमाशकर** ना। किले **सिंहगड** व पाइन तलकोकण **गोरख** किला १

नदी **घोडनये**

**पार घाट** जावलीचे माथा हद इदलशाई होती १

घाटा आलीकडे **धुम वा वई** आसे मु॥ **कृष्ण** वगैरे नदिया

घाट **कावला मुंढेखोराचे** माथा व **कानद खोराचे** माथा १

---

नदी **दारणा** गगा

वाके जिले **गुलशनाबाद राजघाट सावला** मये बारे **कोळीबा** ना। किले **कोथला** तपे आदर व **भाम-नहेर**चे माथा पाइनतलकोकण १

नदी **भाम**

**सेवता घाट राजगडाचे** माथा घाटा आलीकडे **सिरोल** आसे ना। **निरा** १

प्रा **सिवापटण** सागरुन वडुस्ते

**कुभा घाट** दारे आसे **मुठे खोराचे** माथा **देवघाट चादा** दारे आसे प्रा **सोनापूर** १

+मुतसील **कऱ्हानदी**

दारे **आष्टमी हिरडीचा घाट** मुठे खोराचे माथा ना। कुरडी पथक सोनापूर १

**घाट गाढोलोट तेलबैला** व **सावा पैडेखोरे** व **पौन मावल कोरबारसेचे** माथा १

पथक **भोरकस** प्रा **कोथरून**

मु॥ किले **कवार** व **तुगी** व **तिकोना** नदी मु॥ **मुलमठ**

चौत्रे **उबरे** ना। बा। **बोरघाट कुरडी नाने मावल**चे माथा पा। **वाले** व **नवा कसई** मु॥ किले **लोहोगड विसापूर** व **उढा** दोर पाइन तल-कोकण **राजमाची** नदी **इदरायेणी** १

दारे **भोवरगिरी** वाडे ताचे माथा ना। **भीमाशकर** नदी भीमा दारे **आवोली** मीनवन्हेरचे माथा नजीक किले **सीवनेर** १

नदी **मीन**

यादि दास्त पुरवणी **घाट पथकहाये** बमये **गुजर** प्रा **मालसेज उबरे** सा॥र जुनर ता॥ल चौकी

हकीकत बमारफात कानगोह सुभे खुजस्ते बु॥

पथक दारे साबेड **पाथरे** ना। किले **कलोल गड हरिचेंदर**

पा। **वोतूर मुथलणे** मु॥ ता। मा॥र नदी **कोसरे माडवी** १

---

+ जोडलेला, ताब्यांतील.

*कागदाच्या उजवीकडे समासांत तिरप्या तीन चार ओळींत हें लिहिलें आहे.

कोतुल पां चा माथा पथक मा मजकूर वगैरे गुजर ता **मेटे वासेर-खिड** व **पेपखिड** व **सायेखिंड** व **आवीट खिड** व **माणिक वोझर**

गुजर सिदवड ब्राम्हणवाडे आडमार्ग आकोले वगैरे सदर आसे ना मुल नये १

माहाल **वडझेरे** वगैर गुजर हाये मु **पारनेर** गा नी भोयेर ता **रांजणगौ** मा मार १

गुजर पथक राजणगौ साडस व सीरसगौ न्हेवेरे व **कोरेगाउ** गुजर **राजणगौ रुइ रायतले** मु ता मार व **कर्डा** मा चौकी २

सगम मूल मठ भीमा

पथक **कोरेगौ** गुजर तलेगो व **मलठण** व **रांजणगौ** गणेश ता मार व हद **कर्डे** नदी **वेल नये भीमा** १

पथक **खेडकडूस** ता मार ना **भीमा** माहाल १

पा **वाडे** ता मार ना भीमा पथक घोडे ता मार व **चास नारोडी** हद **माहळुगे** मु **घोड नये** १

मा **इदुरी तलेगौ** गुजर **चिचोली** ता **चाकण** माल मार १

मधे नदी **इद्रायेणी**

पथक सिगवे पिंपरखेड गुजर **नारायणगौ** कवीटे तहद ता मार व **आले** नजिक **घोडनये** व **भी(मी)न** १

पथक **घोटे डोलसणे आबेघारगौ नादुर** ता मु पा **कोतूल** व **कर्डे निवोणे** मा मार १

नजीक मूल नये

पा **वेल्हे पिपलवडी** गुजर **घोरी** आले ता मार मु जुनर व वाके जिले **वेल्हे** सार **सगमनेर**

नदी **कुकडी** ना १

पथक **काथी चिमले माडोगन** गुजर ७ ता

मु **कडेवलीत** ४ मु कर्डे **नि-वोने** २ मु **जुनर** १ लग ०

मो मा मार ताद नदी **घोडनये वेलवंडी विलपेने**

पा **बहुतळ पाबल केंदूर** ता **खेड** व मा मार नदी **भीमा** १

**अैवसरी वडगौ** तहद तपे मार व **माहाळुगे** ना **घोडनये** १

पा **पाइटमहे पालखेड** ता हद मु वाडे ना भामनदी १

पथक आबेगौ सिनोली ता मार व घोडे नजीक घोड नये १

पथक **वानरेधामन** गुडगी आदर ता हद मार ना **भाम** १

**नानेमावल** व **पोनमावल** ता मजार हद नजीक नदी **इद्रायेणी** व **पवन** १

वा कमावीस पथकहाये माहाल मजकूर हजूर खडणी चुलदे **जुनेर** आसे—

सदरहू चौकी मोकरा ३६ छेतीस

ले. २
जुन्नर–घाटपांडे

श्री

श. १५६० कार्तिक शु. १५
इ. १६३८ नोव्हें. ११

( प्रारंभीं ७ ओळी फारसी मजकूर व उजवीकडे फा. शिक्का )

+ ( मुतस )दीयानि व स्रोतानि व पथकीयानि व पानसारीयानि व मोढवेयानि (चौ)तरे **उबरे** व समत **माळसेज** देखील घाट व बाजे पथक सा मा सुा तिसा सलासीन अलफ **सिवाजी गोविंद देसपांडिया** चौतरे मा व सा + ( मा ) मालूम केले जे साहेबी देसपाडेपण आपणास नवे दिधले आहे हर + बा पुसी पाचा कागद पुसताती तरी आपणांसि पथक पथकीची कागद ( तळ )चेत नाही पानसारे व मोढवे व पथकी कागद महिनियाचे महिनिया दखल करीत नाही व आपळा मुशाहिरा हक मोईन करुनु दिधला आहे(ती) पथक पथकी पानसारे आहेती ते आपळे हका बराबरी घेउनु पाठउनु देत नाहीत व पानसारियाचा हक लेहोनु मागतों ते देत नाहीत व पानसारे-यासि पेसकसी कोने माहाली काये देताती ते देखल हो देत नाही (बा)जे हकदार हक घेताती तोही दखल हो देत नाहीत ये बाबे परवा( ना पाठ )विला पाहिजे म्हणौनु अर्ज केळा तरी सिवाजि गोविंद देसपांडिया चौतरे मा व सा मा यासि तमाम पथकें-पथकीचे व घाट येथील (तप) सीळ महिनियाचा महिना दखलगिरी करीत जाणे व पानसारीयाचा हक व बरो व पेस कीजे असेळ ते दखल करवणे व पानसारीया करू(नु) देसपांडियाचा हक कुळापासुनु बा मोईनप्रमाणे घेउनु याचे यासि पावीत जाणे व या-खेरीज येक जरियाचा अमळ न करणें व कुळारग हिसे(व) व टीया वा पेठ कौलु देसपाडिया करुनु लिहिवीत जाणे व बाजे वतनदार जे असतील त्याचा हक यासि दखलगिरी करणें परवानियाचि नकल करउनु असेली ना मारापासि असो देणे तेरीख १४ रजब सन हजार १०४८

---

ले. ३
जुन्नर–घाटपांडे

श. १५६३ आषाढ वद्य ३
इ. १६४१ जुलै १५

( फारसी गोल शिक्का* व पांच ओळी मजकूर )

मुतसदीयान चौत्रे **उबरें** सुा इसने आर्बैन अलफ **सिवाजी गोविंद देसपांडिया** चौत्रे मार मालूम केले की बिडवई याचे कुळारग (साहे)ब दखल होत नाहींत तर हाली + + + व ई हाली हुजूर आले + + + ऊन कुळारग + + + + म्हणून मालु( म ) + + + यासि हुजूर + + + + + ( चार ओळी फाटण्यांत गेल्या ) करणे + + व + + जो हासील हि + + होईल त्यावर याचे दस्त + + + तेरीख छ १६ माहे रबिलाखर

---

* फार्सी शिक्क्यांत बद्रुद्दीन काजीचें नांव व हि. ११६४ उल्लेख आहे.

ले. ४ | जुन्नर–घाटपांडे
श. १५६५ आषाढ वद्य ८ | इ. १६४३ जुलै २९

( सहा ओळी फारसी मजकूर व एक शिक्का कागदाच्या उजवीकडे )

मोकदमानी व रया व कुलकर्णीयानीं काा **उबरें** चौत्रे मजकूर सुबे **दक्षण** बिदानद सुाा अर्बा अर्बैन अलफ सन १०५३ **सिवाजी गोविंद देसपांडिया** चौत्रे **उबरे** व साा **मालसेज** हुजूर मालूम केले जे काा मजकूर गहदम सालाबाद् कारकीर्दी मााअबर चौत्रे **उबरीया** खाले कमावसि होती हाली दरम्यान **स्याबीखान** जागीरदार याचे कारकीर्दीसि साा **जुनरीचे** देसपांडिये कसबा समतेखाले जमा करीत होते यावरी आपण साहेबानजीक उभा राहोनु साहेबी तहकीक करून काा मजकूर समते खालुनु दुरी करुनु चौत्रियाखाले दिधला सन १०५१ कारणे दस्त दरबारी दिधले तेथे जमा करून दिधला ये बाबे परवाना दिधला पाहिजे म्हणौउनु मालूम केले तरी काा मजकूर गहदम सालाबादप्रमाणे चौत्रियाखाले दिधला आहे काा मजकूरीचे कागद हिसेब व दस्त पेसजीची कुल फैफती दखल करून पेस्तर सन १०५२ पासुनु दर साल सिवाजी गोविद देसपांडियापासी देत जाणे +मोर्तब सूद फा. मो.

( कागदाचे मागे ) ताा २२ रबिलाखर

( ह्या कागदांतील ' ला ' अक्षर मोडी ल-ला बाळबोधीप्रमाणें काना देऊन काढलें आहे.)

---

ले. ५ | जुन्नर–घाटपांडे
श. १५७७ आषाढ शु. ११ | इ. १६५५ जुलै ४

मुतसदीयानी चौकी **पिंपरी** व **लखा उबरे** व चौत्रे **वडझरे** साा **जुनर** सुाा सिन सन हजार १०६५ **त्रिंबक सिवाजि घाटपाडिया** व चौकी व चौत्रे मजकूर याचे पाडेपण इाा अमलापासुनु आहे हाली चौकी व चौत्रे मजकूर जागीर साहेब अलमास जाली आहे अमा नफर मजकुराचे सिरी सरकारीची पेशकसी मुशकस जाली नाही ये सबब पाडेपणाचा दस्तुराचाः मुलाहिजा करून पेशकसी मुशकस करून हक दस्तुर अमल साबीक मोकरर करून नाा माा चे दुमाला केला असे

तेरीख ९ माहे रमजानू सई लेख

( कागदाच्या उजव्या बाजूस समासांत फारशी वाटोळा शिक्का व पांच शब्द आहेत)

---

+ ह्याच कागदाची अगदीं अशाच मजकुराची दुसरी प्रत आढळते. त्यावर फा. शिक्का मात्र वेगळा आहे. नलुराम किंवा दलुराम अशीं अक्षरें शिक्क्यांत दिसतात.

ले. ६ } श्री { श. १५८२
जुन्नर–घाटपांडे } { इ. १६६०

चौत्रे वडझरे

**मालसेज** उर्फे **नवलाख** साा **जुनर** वगैरे

नवाब कारकीर्द **शाबदीखान** व राजा (वीर) **सिंगदेऊ** वगैरे उंमराऊ जागीरदार

पथक मार **गुजर** बीाा उभा मार्ग व आडमार्ग

साा

१ बेलवडी
१ रुईरायेतले
१ दहीठाणे
१ वीलपदणे
१ चिचोली
१ अकोलवाडी
१ कोहकडी
१ पलसपूर
१ ×× गवान
—
९

१ कोथूलढो रजे अनगरे
१ गाजी भोयेर ताा मार
१ दरी विलानी भोजवरले
पाा मा
—
३

—सदरहू बारा कमावीस देखील हाटबाजार दुकानदार हासील व साली राजा खुर्द ताा असे . (कागदाचे मागे)

**पानसारे मौढवे** चौची मार

गिरदवारी महसूल सिरस्तेमाफीक

इहिदे कतबे सन १०७०

बाो राउजी वलद मेंगोजी मौढवा पाा वाडे गव्हाण चौत्रा मार साा जुनर १

बाो मकाजी वलद तुकाजी पानसारा पाा कोहकडी चौत्रे वडझरे साा जुनर

बाो गोपाणजी येसदेऊ पथकी प्राो बेलवडी खुर्द पारनेर चौत्रे वडझरे साा जुनर

× मोत्याजी वलद × पाा (कोजूल) व × × ×

+ + वडझरे साा मार

बाो सदोवलद फतू व मोती वलद महमद वगैरे पानसारे पाा दहिटाणे चौत्रे वडझरे साा जुनर

बाो भिकाजी वलद अलो पानसारा पाा विलदण चौत्रे वडझरे साा जुनर

बाो भिकाजी व मोती याजी पान(सारे) पाा बेलवडी चौत्रे वडझरे साा जुनर

येकून इसम आसे

—

ले. ७
जुन्नर-घाटपांडे

श. १५८८ माघ
इ. १६६७ जाने. फेब्रु.

( फार्सी दोन[1] शिक्के व सात साडेसात ओळी फा.मजकूर ).

महजर हुजूर मजलीस आं की महसूल द आला ईंदोरी पा मालसेज उबरे कि तालुक खालिसा शरीफ आहे गुमास्ते अंताजि खंडागले अजरुये मूतमर्दी करोडीच्या लोकास दखल देत न्हता दर्यांविला करोडी शामदास हुजूरून आले त्याणि या ममलियासि पोहचोन आपले गुमास्ते मये परवाना नवाब वालाजनाब मदारुलमहामी पाठविले की महसूल जफ्त करीत त्यासि अंताजि खंडागळे याच्या गुमास्तियाने सैदभाई किलेदार चाकण यासि साजोस करून जमेअत होउनू करोडीचे गुमास्ते धरून नेवउनू किलियामधें बंदखानि घातले आणि म्हणतात की खालिसाचे माहालीचे पैके आपण घेऊनू पातशाही करोडीच्या लोकांस दखल नेदून हा महजर सही तेरीख —माहे रमजानु

१ *द्दा गोही त्रिंबक सिवाजी देसपांडिये पा मालसेज उंबरे बमहजर सही

१ *हणमोजी नाई(क) नाइकवाडी मोढवे चौ(त)रे मार

१ *मालजी हेगोजी पाणसारा चौतरे मार

( कागदाचे मार्गे ) मोकदम व सेटे का उबरे नवलाख

( निा नांगर ) ( चिन्ह ) ( निा ता ) ( चिन्ह )

---

ले. ८
जुन्नर-घाटपांडे

श. १५९० माघ शु. ५
इ. १६६९ जानेवारी २६

( सवा दहा ओळी फारशी मार व गोल शिका शिक्क्यांत, असदुद्दीन मुहम्मद अहमद काजी खादिमे शरा, असें नांव आहे. )

नकल महजर शरीयेत पन्हा काजी इभराहीम मरहूम वगैरे हजिरानी मजलसी आंकी महजरनामा व हुजूर हजरानी मजलसी व मोकदमानी व रायानी व मुजारियानी साकीनानी कसबे माहालिंगे सा जुनर आकें त्रिंबक सिवाजी देशमुख व देशपांडिये प्रा मालसेज उबरे यानी कसबे मजकुरामधे हवेली केली होती त्यांसी अगवाड्यापुढे येक डालानी केले होते आपला असबाब व सनदा पत्रा देशमुखी वगैरे वतनाचे कागदपत्र तेथें ठेविले होते त्यांसी येकायेकी बतारीख ३ तीसरा माहे

---

१ ह्या पत्रावरील एका शिक्क्यांत शमसुद्दीन काजीचें नांव आहे.

* ह्या तिन्ही सह्या आडव्या ओळींत लिहिल्या आहेत. तीनहि अक्षरें भिन्न भिन्न.

रमजान सन १०७८ येक पाहार रात्र पहिली गुदरलियावर डालानी मजकुरावरी आगी येऊन पडली आनी ते डालांनी आगवाडी याचे जलोन गेले त्यांमधे कागद सनदी पत्री वगैरे कितेक होते तेही जलोनी गेले काही हाती लागले नाही—ये बाबे पुरसीस कोन्ही वख्ती हकमाची होईल म्हणवून महजर नामा केला असे की येके वेलेस हुजती होऊन येईल तेरीख सदर कलमी सूद

---

ले. ९ जुन्नर–घाटपांडे — श्री — श. १५९१ माघ वा। ११, इ. १६७० फेब्रुवारी ६

( आठ ओळी फारशी मजकूर व वाटोळा शिक्का )

इजत असार **त्रिंबकजी घाटपांडिया** पा। **मालसेज उबरे** बिदानद सु॥ तिसा सनहजार १०१९ मालूम दानद घाट बदीस खर्च जाहाला आहे त्याची जागा घेणें रुपये ६० (बा।) तमसूद आदा करून घेणे—(बा।) पारसी अमल करणें मो। तेरीख २५ रमजान

( कागदाच्या पाठीवर चौकोनी फारशी शिक्का )

---

ले. १० जुन्नर–घाटपांडे — श्री — श. १५९३ आश्वीन वा। ३, इ. १६७१ आक्टोबर ९

मसरूल अनाम राजमान्य राजेश्री **त्रिंबक खिवदेऊ घाटपाडे** जकाती **उबरे मालसेज** यासी **राघो बलाल सुभेदार** समत **जुनर** सु॥ इसने सबैन अलफ **सिदोजी प्रतापराऊ** निगावान जकाती **नाणा घाट** यार्णे लिहिले जे **त्रिंबक घाटपाडिया** जुनरी बैसोन नाणे घाटीची जकातीची कमावीस करून पैके नेतो म्हणोनू लिहिले तरी मधेच बैसोन बकालास रंजीस करिता हा काये माना अता कागद देखताच आमचे भेटीस येणें तुमचे घाटपाडेपण चालउनू सुखे चाकरी करून आपले बरे करून घेणें जरी येसे करीत नाही तरी बरे होणार नाही ऐसे समजोन भेटीस येणें इतक्या उपेरी बकालास रंजीस न करणे छ १५ जमादिलाखर मोर्तब सुद ( फारशी कोयरी मोर्तब )

( कागदाच्या मागील बाजूस ) पौ छ २८ रजब

---

ले. ११
जुन्नर–घाटपांडे

श. १६०४ माघ शुा ७
इ. १६८३ फेब्रु. २५

( ८, ९ ओळी फारसी मजकूर व ३ शिक्के )

वजारत येक बालपन्हा मदारुल महामी किफायेत खान

चिठी देसमुखानि व देसपांडियानि व मोकदमानी व रयानि व मुजरियानि पाा चौतरे **मालसेज उबरे** साा **जुनर** सुबे **अवरंगाबाद** उर्फ **दक्षण** सुा सलास सन १०९२ बहुदे बेाा **बहिरजी** वाा **माणकोजी पांढरे** मनसब्रा + + + + + + + (कागदाच्या मार्गे) वगैरे साबिक दर पाये बाकी रुा तनखा मााइले इा निस्प ताा येतील बमोजीब परवाने व मोहर माो सूद—— दाम ८३५०००

माा आठ लाख पंचतीस हजार दाम रास

अज ताा लखमोजी वाा नाइकजी पांढरे की थैवज याफ्त दाम ७०५००० रुजु दफ्तर जगनाथ वाा गणाजी राम व सुंदरजी कानुगो

अज ताा राणोजी वाा भागोजी सिंदे की थैवज पाा दाम ७९५००० वजा दर पाा ६६५०० बाकी १३००० रुजू दफ्तर देवाजी मेंगनाथ व वेजोजी नरहरी कानुगो सुबे कराड व खानदेश व तेलंगण

सदरहूप्रमाणे बमोजीब चिठी रुजू होउनु मााइलेच्या गुाायास उहदेवार अमल दीजे माा सूद छ ६ सफर

---

ले. १२
जुन्नर–घाटपांडे

श्री

श. १६१० ज्येष्ठ शु. ७
इ. १६८८ मे २५

( फारशी शिक्का व मजकूर आठ ओळी )

नकल सके १६१० वैभवनाव सवछरे जेस्ट सु(धस)प्तमीं सुक्रवार ते दिवशी खरीद कर्दे **हसनखान** वाा **राजेखान** साा शहर **जुनर** +++ वकरीकर्दे **खासाजि** व **आताजि** फर्जदान **मुराजी** पानसारे काा **वाडे** व **भोवरगाव** पथक पाा **मालसेज उबरे** साा **जुनर** सुा सन १०९७ कारणे लेहोन दिधला यैसे जे आपले वतन पानसारगिरी काा माार व मारगीर हर दो जागाचे वडिलाचा मिरास हर दो भावाचा हिसा १ येक व **जाणोजी** वाा **जैनाजी** हिसा १ येक व **ताम्हाजी** वाा **समाजी** हिसा येक १ येकून तीन हिसे आहे यामधे आपला दो भावाचा हिसा तिसरा दोघाजणी तुम्हास खुश रजावदीनें विकत दिधला रुाये ४० चालीस घेऊन

फरोख्त केला आसे तुम्ही तिसऱ्या हिस्याचे खावंद केले आसा तिसरीया हिशास भाडोंन झगडो तरी गुन्हेगार व गोताचे आन्याई तुम्ही आपली मिरासी जाणौउन लेकराचे लेकरी खाने वतनाची च्याकरी करीत जाणे तिसरीया हिस्याप्रमाणे तिसरा हिस्सा तुम्हास दिधला आसे तुम्हासी आम्हासी लेकराचे लेकरी समंध नाही लेकराचे लेकरी वतन आर्जानी करणे तुम्हासी कोन्ही तिसऱ्या हिस्यास मुजाहिम होईल त्यास आपण वारून तुम्हासी संमध नाही हे लिहीले सही

बा। खासाजी पानसरे पा। मार

ढ—

तान्हाजी वा। शामजी पानसारे का। वाडे

माणकोजी कडू

आमदजी पानसारा बिन तोन महमद का। आचेगाऊ

महमदजी वा। मलीकजी घिवारी

वलीभाई

सदोजी वा। सुलतानजी घिवारी

हसाजी वा। दादोभाई घिवारी

आलीभाई पानसारा

घाट औफत

पत्रप्रमाणे साक्ष

हरभट + क्षे त्री

---

सा। शहर जुन्नर + + + व करी(द)

ले. १३ जुन्नर–घाटपांडे

श्री

श. १६१३ आषाढ वा। ११
इ. १६९१ जुलै ११

राजेश्री **सीवाजी त्रिबक** घाटपांडे पा। **मालसेज उमरे सा। जुनर** सन हजार ११०१ ते दिवसी **नारायेण भट गंधे** सा। **पारनेर** लेहून दीधले ऐसा जे **त्रिबकपंत** तुमचे बाप त्यानी **बालभट गंधे** सा। पारनेर यापासून कर्ज घेतले रु. ५० घेतले होते त्याचे खत आपणापासी होते ( ते ) तुम्हास देऊन पैके आपण घेतले त्यास तुम्ही उजूर केला जे त्रिबकपताचे हातीचे खत नव्हे तरी आपणापासी खत हेच होते ते तुम्हास दिधले काल कला आपल्यापासी त्रिबकपताचे दस्तुरनसी खत निघाले ते रद्द असे अपणास पैके झाडियानसी पावलें——गुजाणी आपली बहीण **मनाबाई** व आपण(चे वा ) अर्थाअर्थी समध नाही यास श्री साक्ष असे बा। सिवाजी ( ! ) कुलकर्णी मौजे **रांजणगाव** ————तुम्हासी कोन्ही खत त्रिबकपताचे दस्तुरनसी आणुन तुम्हास मुजाहीम होईल तरी आपण जाब करून छ २४ माहे सौवाल हे लिा सही

गाही

गणेशभट बीवणेकर

---

ले. १४ जुन्नर–घाटपांडे } श्री { श. १६१३ इ. १६९१

यादि राजपत्र सिवाजि त्रींबक घाटपाडे परगणे मालसेज उर्बरें सरकार जुनर यासि मुख्य वतनीपत्र तुमचे घाटपाडेपण कद्‌मिल आयाम चालत आले आहे. तेणे प्रमाणे आपले वतन वंशपरंपरेने अनभऊन आपला हकलाजिमा पुरातनप्रमाणें घेऊन सुखे वतनी सेवा करीत जाणे म्हणऊ(न) राजपत्रे १ *दूणें

(*अक्षर वेगळें)

---

ले. १५ जुन्नर–घाटपांडे सु. १०९९ जखर १४ } श्री { श. १६२० मार्ग. वद्य १ इ. १६९८ डिसें. ८

राजश्री सेना सप्तसहस्त्री व पंचसहस्त्री व सहस्त्री पागा सिलेदार
गोसावी यासी

॥छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—— स्नों [1]**शंकराजी नारायण सचीव** आसीर्वाद सुहूर सन तिसा तिसैन अलफ **मालो नरसिह** दिमत **सिवाजी त्र्यबक घाटपाडिये** जकात चौत्रा **उबरे** वगैरे हे आपले वतनावरी राहोन दुतर्फा चाकरी करितील त्यास कोणी येकजरा तसवीस सेवेस न लावणे छ १४ +जमादिलाखर +संदेश समक्ष पत्रा

वधिरयं (अष्ट बुरुंजी मुद्रा) श्री
भाति शंकराजी
नारायण (पत्राच्या पाठीमागे केवल ही मुद्रा)

+सुरु सुद

---

+ अक्षरें दोन्ही भिन्न.

१ शंकराजींना श. १६१२ = (इ. १६९० च्या) वैशाख ते पौष ह्या अवधींत सचिवी मिळाली. भा. इ. सं. मं. त्रै. व. ९ अं. ३ पृ. ६६, ६७. त्या सनदेंतहि दुतर्फा शब्द आला आहे. तेंहिपत्र शंकराजींचेंच आहे. शि. च. सा. खं. ८ ले. २६ मध्यें जोवरी ‘गनिमाची धामधूम आहे तोवरी दुतर्फ उगवणी देउनु कीर्दी करणें असें वाक्य आहे व त्या लेखाचा काल श. १६१२ माघ वद्य ४ इ. १६९१ फेब्र. ६ हा आहे.’

ले. १६ जुन्नर–घाटपांडे

श. १६२९ भाद्रपद वद्य ११
इ. १७०७ सप्टेंबर ११

( फारसी वर्तुळी शिक्का, शिक्क्यांत चापाजी + नाथे बंदे बादशहा अलमगीर असा मजकूर आहे. )

राजेश्री आबाजी शामराऊ वकील मोकदमी कसबे पारनेर सा। जुनर सु॥ सन १११७ कारणे चांपाजी राजे खलाटे निस्प मोकदम कसबे मा।रचे यैसी जे तुम्हास खिजमत वकिली मोकदमीची सांगितली होती त्यास तुम्ही हजुरी दोन परवाना बमोहर दिवाण आला आमिरल उवराऊ व कबज खजानाची बाबत पेशकसी सरकार——व महजर बमोहर जमीदार व चिटिया गुमस्तीयास हसील करून आम्हास पोहचविला व तुम्हापासी हिसेबू दरबारखर्चाचा होता तो समजोन घेतला असे व २ दोन फर्द मोहरी मा। माहादेऊभट पोल फर्द १ येक व मा।नुलेचेकडे १ येक येकून २ दोन फर्द आमचे + + मोहरनसी तुम्हापासी होते त्याचा हिसेबु अम्हास समजाविला बा। जमाखर्च त्यासिवाय तुम्हापासी फर्द मोहरी वगैरे हिसेबु असेल तो रद असे तुमचा व आमचा हिसेबु मा। त्रिंबक गंगाधर सेकदार व सिवाजी त्रिंबक घाटपांडे फारीक जाला असे तुमचा दामदरीम आपणाकडे नाही व अपला तुम्हाकडे नाही बमोजीब जमाखर्च बमो तुमचे हिसेबु समजोन घेतला असे तो हिसेबु सानींन हाल नवादिगर जाला तर बा। जमाखर्च तुम्हास रुये फिराऊन देणे लागतील व तुमची जामिनी खत विसाजी माहदेऊ वकील देसमूख सा। जुनर याची आहे ते रद असे व तुम्ही फारखती व जमाखर्च दिल्ह असे त्यासिवाये कबजे तुमची असतील ते रद असे ई॥+ छ २१ माहे जिल्हेज सन १११३ तेरीख ता। छ† २५ माहे जमादिलाखर सन १११७ सन अहद तुमचा हिसेबु व हक्क व मुशाहिरा तुम्हास दिल्हा असे तुम्हासी आम्हासी निसबत नाही मोर्तब सुद ( गोल तिवलची शिक्का )

---

ले. १७ जुन्नर–घाटपांडे

श. १६३० मार्ग. शु. ५
इ. १७०८ डिसें. ६

( १९ ओळी फार्सी मजकूर व शिका* मोर्तब )

येकरार मातबर सही शरईनमूद मुखबीर ब इस्म व नसबूद मुसमां उभाई कुचे शकरभट वैद जुनारदार साकीन जुनेर सु॥ सन १११८ कारणे लेहोन दिधले यैसे जे मबलग रु॥ ५०~— मो पनास रु॥ रास सिवाजी त्रिंबक घाटपांडिये पा। मालसेज उबरें यांचे कर्ज आपलें जिमे आहे याचे यैवज शहर मारीं आपले घर आहे त्यापैकीं निस्प घर दर यैवज कर्ज मबलग मजकूर मा।इले यासीं गाहाण ठेविलें आसे त्यासी मबलग मजकूर आदा करावयाबदल व बराये खर्च कुतखुद आपलें घर

+ श: १६२६ चैत्र व. ७ † श. १६२९ भाद्र. व. ११

* फार्सी शिक्क्यांत मोहमद हें काजीचें नांव व हि. सनाचा १११४ हा आंकडा आहे.

करून कारभार केला व संपति मिळविली इष्टमित्र साईरे व सहोदर या सर्वांचे चालविले चाकरीमुळे नाना प्रकारचे किले **नगर** व किले **वहुला** व किले **सुमारगड** ऐसे कष्ट आपण भोगिले व वतने खुपखरेदी करून इनाम वगैरे संपादिली आमचे पालण लहानपणापासून आपले पुत्र म्हणोन सर्वात्मना करीत आले व त्याजला **उज्यनींत शिंदे** याणी राज्यकारणामुळे हस्तगत करून सरकारांत पाठविले ते समई त्याणी आपले परिणामाचा दूर अंदेशा चित्तांत आणून मी त्याजवल संनिध नसता आपला सर्व विषय वतने व इनाम वगैरे आमचे आम्ही अणभवावा ऐसा कागद आमचे नावे लेहून पाठविला त्याच श्रमात आमची मातोश्री व भगिनी या उभयतानी विष घेऊन प्राण सोडिले ऐशास येकोदर बंधु व त्याचे पुत्र स्त्रियासहित कुटुंबसुध्धां सर्वांचे आमचे तीर्थरूपी पोषणभरण केले लहानाचे मोठे स्वरूपास आले असता सहोदर पुत्रासहित तिलमात्र त्यांचे उपयोगी पडिलेच नाहीत त्याजला सरकारांतून **सुमारगडावर अटकेस** ठेविले ते काली वृत व इनाम वगैरे सर्व घरेदारेसुध्धा सरकारांत घेतली यामुळे सर्व बुडाले कर्ज साहुकारी देणे येक लक्ष रुपये राहिले चुलते व त्याचे पुत्र व कारकून मिळोन.......

(या छोट्या उताऱ्यावरून कांहीं गोष्टीचा नीट खुलासा होतो. चिंतो विठ्ठलानें इष्टमित्र सोईरे-धायरे व सहोदर यांचे चालविले. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर ते सर्व चिंतो विठ्ठलाचे मुलाविरुद्ध गेले. नारायणरावाच्या वधानंतर चिंतो विठ्ठलास कैदेंत ठेविले होते; ते तीन निरनिराळ्या किल्यावर ठेविले. प्रथम महादजीनें वडगांवच्या लढाईनंतर त्यास उज्जयिनीस नेऊन तेथील किल्ल्यावर ठेविले. तेथून त्याची रवानगी महाराष्ट्रांत झाल्यावर त्याला नगर, बहुला व सुमारगड या किल्यावर कैदेंत ठेविलें. शेवटच्या किल्यांत असतांच चिंतो विठ्ठलाचा मृत्यु झाला. तेथें असतांच त्यानें आपली सर्व इस्टेट आपला दत्तक पुत्र त्रिंबकराव याच्या नांवावर चढविली; परंतु त्याचें दत्तकपत्र कायदेशीर नाहीं असा दावा चिंतो विठ्ठलाच्या भाऊबंदानीं त्याच्या पुत्राविरुद्ध उभा केला व त्यास त्रास देण्यास सुरुवात केली.)

**ले. ६४** रायरीकर-दप्तर } श्री { श. १७०४ श्रावण इ. १७८२ जुलै-ऑगष्ट

विनंती विशेष **चिंता विठल राईरकर** हे किले **सुमारगड** येथें अटकेस होते ते शुा श्रावणमासी वारले त्याची क्रिया होणें आहे त्यास ते जिवंत असता वैशाख शुा ३ स **रामभट काणे देवधर** यास लोटी पितली व पीतांबर व धोत्र व आरणीचे पुस्तक व विष्णुसहस्त्रनाम व सिवसहस्त्रनाम व सुवर्णाचे पवित्रकं दिल्हे आणि बंदीखान्याबाहेर तुलसीवृंदावनी येऊन सुर्यनारायेणास नमस्कार करून ब्राह्मणास हाक

मारून सांगितले की मी संन्यास ग्रहण आचरण केले याजप्रों बो(ल)ले त्याजवर चहु महिनियानी वारले त्यास आम्र दिल्हे असे जाहले आहे येविसी शास्त्रार्थ पाहिला पाहिजे तरी पोथी पाहून ठेवावी.

( या पत्रावरून चिंतो विठल सन १७८१ मध्यें जुलै–ऑगष्ट मध्यें वारला हें निश्चित होय. रिसायतकारांनीं चिंतो विठ्ठलाच्या मृत्यूची तारीख दोन ठिकाणीं निरनिराळी दिली आहे. मराठी रिसायत मध्यविभाग ४ पान २८२ वर दिलेली तारीख, व मराठी रियासत उत्तरभाग १ पान ४२४–२५ वर दिलेली ( सन १७८३ ) तारीख अशा दोन्ही तारखांत मुळींच मेळ नाहीं. 'शकावलींत सन १७८१ मध्यें चिंतो विठ्ठल केदेंत असतां किल्ल्यावर संन्यासी वारले' असा त्यानीं उल्लेख केला आहे तोच बरोबर आहे. मात्र वरील पत्रांत दिलेली त्याच्या संन्यासाची हकीकत व त्याच्या मृत्युवर्षाचा नक्की महिना अधिक आहे तो लक्षांत ठेवावयास पाहिजे. याशिवाय खालील उताराहि वरील विधानास पुष्टि देण्यास समर्थ आहे. तो उतारा अप्रसिद्ध आहे. )

ले. ६५ } श्री {
रायरीकर–दप्तर }

शके १६९६ वीत जप्ती जाहाली त्या काली भावावर कसाले गुदरले याचा अर्थ पाहता नव्याणवाचे अगोदर **चिंतो विठल** याजवर सरकारचे पेच येऊन जप्तीही होऊन मोकलीकही जाहाली परंतु नव्याणवपरियंत चिंतोपंतासंबंधीं कोणाही भावास उपद्रव जाहाला नाहीं ऐसे त्याचेच लिहिण्यांत सिद्ध जाहाले चिंतोपंतास सिंद्यानीं कैद करून रवाना केले ते सरकारांतून किले **सुमारगडास** पाठविले त्यावेलेस **त्रिंबकराव चिंतामण** व कारकून मंडलीसुध्धा दोन वर्षे छपून होते त्या काली भाऊबंद यासी किमपि उपद्रव जाहाला नाही शके सत्राशे तिहीचे साली **चिंतोपंत** सन्यस्त होऊन किल्ल्यावर दिवंगत जाहाले हे ऐकोन बंधु व पुतणे व कारकून याणी येकमत करून चिंतोपंतास संतति नाही त्याचा विषय आम्ही सरकारांत दाखवून किफाईत करतो वृत्ति व आसाम्या व घरे आम्हास द्यावी ऐसे समजाऊन **नारोपंत चक्रदेव** याजकडे परवानगी घेऊन रुजु जाहाले आणि दोनतीन ठिकाणच्या ठेवी आणून सरकारांत दिल्ह्या त्याचे दाखले सरकारात आहेत त्यावर **त्रिंबकराव चिंतामण** याणी **नाना फडणिसास कृष्णराव बल्लाल काळे** याचे विद्यमाने भेटोन आपले वर्तमान सांगोन चिंतो विठल याच्या आस्थी किल्ल्यावरून सार्थक करावयाकरिता आणविल्या **अनंत रामशास्त्री** बावा यांचे विचारे यथोक्तविधीने त्रिंबकराव याजपासून पुत्रधर्मे अऊर्ध्वदेहिक करविले पुढे त्याच मार्गे सरकारातून कृपा करून चिंतोपंताचे विषय ज्याणी अभिलाष बुद्धीने ठेविले होते तिकडून तगादे करून आणवावा म्हणोन **उययराम कृष्ण** ( बापट ) यास आज्ञा जाहाली त्याणी ते काली **रामचंद्र कासी** वगैरे कारकून चिंतोपंत याचे बंधूस मिलाले

होते त्यास धरून आणून चौकसीकरिता त्याणी ठेवून दिल्हे त्यांत **गोंद जोशी** (रायरीकर) याजकडे रुपयाचे दागिने पेशजीचे होते ते मात्र आणिले **केशव जोशी** (रायरीकर) याजकडे कानगोचे हिशेबासंबंधीं बाकी साडेबेतालीस हजार रुपये **रण-सोड गिरमाजी** याणि काढिले त्याकरिता आणून तगादा केला ते काली चिंतो विठल यांचे घरच्या ठेवीठेवी वगैरे कागद सरकारात देतो म्हणून **सदाशिवभट नाना** याज-कडून समजाऊन कागद **नानल** याजपासी देऊन निरोप आणून तगाद्यापासून निघाले तो मुदा हाली आहे.......................

---

(चिंतो विठ्ठल बापूंपेक्षां वयानें लहान व नाना फडणिसापेक्षां वडील होय. त्याच्या जन्मासंबंधींचा खालील पुरावा अस्सल आहे, तो असा— )

**ले. ६६** रायरीकर–दप्तर — श्री — श. १६५६ चैत्र वद्य ९ / इ. १७३४ एप्रील १४

**चिंतामणेर्जन्मकालः**

शके १६५६ आनंदनाम संवत्सरे चैत्र वद्य नवमी भौमवार
घटि ४१ पले० नक्षत्र धनिष्टा घटि ४६ पले० तद्दिने
आस्ताग्दत घटि २ तदा चिंतामणेर्जन्मकालः

---

## गणेश कृष्ण गद्रे यांचीं कर्नाटकाकडील बातमीपत्रें

**ले. ६७** पत्र क्र. १ — श्री — श. १७१२ श्रावण वद्य ११ रवि. / इ. १७९० सप्टें. ५

*पो छ ७ मोहरम (अक्षर वेगळें. भाद्र. शु. ९ = सप्टें. १७)

श्रीमंत राजश्री——**तात्यासाहेब** स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक **गणेश कृष्ण** कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ता छ २५ माहे जिल्हेज श्रावण वद्य ११ रवीवार पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्तित आसे विशेष आलीकडे पत्र येत नाही तेणे करून चीत सापेक्षित आसे निरंतर कृपा-

---

* हीं पत्रें टिपूवरील दुसऱ्या स्वारीचे वेळचीं बातमी देणारीं आहेत. तात्या म्हणजे पांडुरंगराव पटवर्धन. भाऊ = परशरामभाऊ पटवर्धन. नाना = नाना फडणवीस.

पत्रीं सेवकाचा सांभाल केला पाहिजे यानंतर या प्रांतीचे वृत श्रीमंत राजश्री—**भाऊसाहेब** फौजसुधा **कितुर** प्रांताजवळ आले आहेत आमित्राकडील **वादरूल जमाखान** दाहा हजार बार(कंदाज) व तोफा घेऊन **धारवाडा**नजीक आहे आद्याप यांचे त्यांचे झुंज नाही आंतरेयाणेच आहेत मग पाहावें श्रीमंताचे पुण्यप्रतापें करून फतेच होईल आणखी त्याची फौज दक्षेणेकडून यावयाची दिसत नाहीं प्रस्तुत मजकूर हा आहे आधिकोतर मागाहून जाहालिया विनंति पत्रीं सेवेसी लेहून पाठवीन **भाऊ**साहेब तमाम लाहानसाहान ठाणी घालीत आहेत **धारवाड** वगैरेहि हस्तगत होतील येसा प्रकार आहे बोलचाला उत्तम दिसतो श्वामीनी राजश्री भाऊसाहेबास कोठे मामलतीविसी ल्यावे या समयात घडोन येईल श्रीमंत राजश्री—**नानासाहेब** फौजसुधा या प्रांती येणार **जालेहाल**हि त्याजकडे होईल आपण मामलत केल्यास उतम हिकडे येऊं लागतील ते समई तीा राजश्री **बाबूराव दादास** बरोबरी पाठविले म्हणजे कोठे तरी योग घडोन येईल येसा विचार आहे हिकडे पाऊस नाही पेरणी जाली नाही धारण दीड पायली दाणे मिलत नाही. येसा कहर ईस्वरे आणिला आहे सदैव पत्र पाठऊन साभाल करावा बहूत काय लिाा लोभ करावा हे विज्ञापना

सेवेसी पाो **माहादाजी रामचंद्र** साां नमस्कार विनती येसी जे लिखितार्थ श्रुत होऊन निरंतर रुपापत्री सेवकाचा सांभाल करीत गेले पाहिजे लोभ करावा हे विाा

---

ले. ६८
पत्र क्र. २

श्री

शा. १७१२ श्रावण वद्य ११
इ. १७९० सप्टें. ५

पुाा श्रीमत राजश्री——**तात्या**साहेब
स्वामीचे सेवेसी———

विज्ञापना येसी जे चे* पत्र **बागलकोटेस** पाठवावे की चरमी सामान व *सुती पंचवीस रुाो याचे सालास देत जाणे या प्रकारे पत्र पाठवावे परंतु पत्र येत नाही तेव्हा सेवकाचा उपाय काये सेवेसी विनंती करितो की **श्रीमंत** वाईस आहेत त्याचे पत्र **बागलकोठास** पाठवावे की सालाबाद कारकुनीचे यकसे त्रेसष्ट रुाो व चरमी व *सुती पंचवीस रुाो चे सामान देत जाणे येसे पाठवावे म्हणिजे रुाो व फर्मास येईल येरवी येत नाही लस्करचे वर्तमान तरी **टिपूला*** खबर सुधा **पटणा** आलीकडे आहे श्रीमंत राजश्री **भाऊ** व **तात्या** व **मोगल** व **फिरंगी** सहीत **मोती तलावर** आहेत लस्करांत माहागाई आहे तूर्त छावणी आहे इकडून माणसे मार्गाची निभावत नाही हजार दोन हजार जमा जाहाले तर* निभाव होत नाही येसे वर्तमान आहे कोणी तिकडून आलियावर तहकीक वर्तमान सेवेसी लिहीन रोख रुाो १५० दीडसें आरकट गजी कोठ प्रत पाठविले आसेत **आथणी**हून हुंडी करून देणे म्हणोन चिरंजीव राजश्री **विष्णुपंत** यासी लिाा

---

* हें सर्व असेंच आहे. तेथें 'सुर्ती', 'टिपूची', 'तरी' हें वाचन केल्यास चालेल.

आसे सोय आल्यास करून देतील चैवज पाठवावयाचे मोठे संकट वाट सुदामत चालत नाही चैसा प्रकार आहे मशालचीचे रुो पाठवणे म्हणोन लिा त्यास सरकारातुन नेमणूक आकरमाही प्रो येतात ते श्वामीकडे पाठवितो आणिक रुो घेऊन मी येथे येऊन दगाबाजी श्वामीचे चरणास करणार नाही सर्व आधार आपला दुसरा विचार नसतां वरवर सेवकास लिहिता हे उतम आसे राजश्री **कृष्णराव** याणी पत्र दिल्हे ते बजिनस सेवेसी पाठविले आसे +बहुत काय लिा लोभ करावा हे विज्ञापना

+श्रीमंत राजश्री **रघुनाथराव दादास** सां नमस्कार विनंती लिा परिसोन लोभ करावा हे विज्ञापना

——

**ले. ६९** पत्र क्र. ३ } श्री { श. १७१२ कार्तिक शु. ५ गुरुवार { इ. १७९० नोवें. ११

श्रीमंत राजश्री——**तात्यासाहेब** स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक **गणेश कृष्ण** दोनी कर जोडून सां नमस्कार विनंती विज्ञापना ताा कार्तिक शुा ५ पंचमी पर्यंत मुकाम पाा **बागलकोट** येथे सेवकाचे वर्तमान उतम आसे विशेष सांप्रत श्वामी कडून पत्र येऊन सेवकाचा साभाल होत नवता त्यास तीा राजश्री **बाबूराव दादा** श्वामीनी श्रीमंत राजश्री——**नानासाहेब** याजकडे जावयासी पाठविले ते येथे बुधवारी आले गुरुवारी भोजन करून परभारे **बदामी**कडून लस्करास गेले सविस्तर सागितले त्याजवरून सतोष जाला इकडील वर्तमान तरी सरकारच्या फौजा **लखमेश्वरावरी** आहेत आमित्राची फौज **सावनुरा-वरी** आहे जुजभाडण तूर्त काही नाही वरकड वर्तमान आधिकोतर काही नाही आम्ही **केरुरचे** जमाबंदीस आज चार दिवस येथे आलो आहो आणिख आठ दिवस लागतील श्वामीनी पेसजी आज्ञापत्र पाठविले तेथे आज्ञा की श्रीमताकडे काही लस्करास फरालाचे जिनस उपयोगी व भाजी पाठवीत जाणे आज्ञेप्रो वरचेवरी जिनस पाठवीत असतो घोडीविसी लिा त्यास पेसजी विनंती लिा त्याजवरून कललेच असेल रास लाहान श्रावण मासी पसवली कामाची नाही तीा राजश्री **दादासहि** दाखविली तटाणोची जात आहे **बागलकोटासच पाठविली** वरचेवरी पत्र पाठऊन सेवकाचा साभाल करावा सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

चिरंजीव राजश्री **बापूजीपंत** यासी आसीर्वाद तीा **गोपालपंत दादा केरुरासच** आहेत सर्व सुखरूप आहेत हे आसीर्वाद

——

+ अक्षर वेगळें.

ले. ७०
पत्र क्र. ४

श्री

श. १७१२ मार्ग. शु. २।३ बुधवार
इ. १७९० डिसें. ८

श्रीमंत राजश्री——**तात्यासाहेब** स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक **गणेश कृष्ण** दोनी कर जोडून चरणावरी मस्तक ठेवून सिरसां नमस्कार विनंती विज्ञापना ता। मार्गसीरष शुा। २ द्वितीया बुधवार पर्यंत मुा। **केरूर** येथे सेवकाचे वर्तमान यथास्तीत आसे विशेष आलीकडे पत्र येऊन सांभाल होत नाही तरी सदैव पत्र पाठऊन सेवकाचा सांभाल करावा यानंतरी इकडील वर्तमान तरी सरकारच्या फौजा **सीरटीवर** आहेत **तुंगभद्रेस** पाणी गल्या बरोबरी आहे आठच्यार रोजात कमी जाले म्हणजे वसि तीस हजार फौज धारवाडच्या सुमारे ठेऊन वरकड फौज नदीपार होणार याश्रो मजकूर आमित्राची फौज **सावनूरच्या** आसपास दोन कोसावरी आहे लढाईचा प्रसंग नाही ती। राजश्री **बाबुराव दादा** लस्करातून **श्रीमंताचा** निरोप घेऊन निघाले ते इंदुवारी **जालिहालास** आले तेथून मंगलवारी **बदामीस** आले आज **केरूरास** बुधवारी येतो म्हणोन पत्र आले वो। राजश्री **बाबूभटजी जोग** सुधा आहेत भेटी नंतरी सर्व कलो येईल पेसजी विनंती पत्र पाठविले ते पावले तेथे आज्ञा की जाते समई साठ रुा। नेले त्याचा खर्चवेच कसकसा ते लिहिणे म्हणोन आज्ञा येविसीचा हिशेब आलाहिदा जमाखर्च तपसिलवार पाठविला आहे त्याजवरून कलो येईल मी पदरचा सेवक जाले वर्तमान बरचेवरी विनंती करितो सर्व मनास आणून आज्ञा करणार आपण धणी आहेत सविस्तर मजकूर नाइकजी सांगता कलो येईल बहुत काय लिा। लोभ करावा हे विज्ञापना

हो। श्रीमंत राजश्री **रघुनाथरावदादास** सांा। नमस्कार विनंती लिा। परिसोन लोभ करावा सर्व मजकूर श्रीमंत राजश्री —— यजमानास लिा। आहे त्याजवरून कलेल हे विज्ञापना

**गोपाल नारायेणे** सां नमस्कार सदैव कृपा करीत जाणे हे विनंती

---

ले. ७१
पत्र क्र. ५

श्री

श. १७१२ पौष शु ९
इ. १७९१ जाने. १३

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री **गणेशपंत सुभेदार** ता। **केरोर दादा** स्वामींचे सेवेसी

सेवक **सदासीव कान्हो** मुा। **नवलूर** नजीक किले धारवाड रुतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तां पौष सुध्ध नवमी +बुधवार पावेतो आपले

---

+ मोडक जंत्रींत गुरुवार आहे.

कृपे करून सुखरूप असो विशेष तुम्ही **नंदराम रजपूत** याजबराबर पत्र राजश्री **गंगाधरपंत करंदीकर** यांस पाठविले ते पत्र घेऊन आज पांच साहा रोज लस्करात फिरला व आम्हीहि शोध केले परंतु मशारनिलेयाचे येथे कोठे ठिकाण लागले नाही आपण शब्द ठेवितील याज करितां हे पत्र आपणास लिा आहे आम्ही येथे काही लोक घेऊन आलो होते ते रुजु जाहले आहेत कलाव या करिता लिा आहे **नंदराम** याणी लस्कर सारे फिरोन पाहिले परंतु ठिकाण लागले नाही कलावे बहुत काय लिहिणे कृपालोभ करीत जावे हे विनंती

---

ले. ७२ }
पत्र क्र. ६ }  श्री  { श. १७१२ पौष शु. १५ गुरुवार
{ इ. १७९१ जाने. २०

श्रीमंत——राजश्री **तात्या साहेब** स्वामींचे शेवेसी

विनंती सेवक **गणेश कृष्ण** कृतानेक साा नमस्कार विज्ञापना ताा छ १५ माहे जमादिलोवल पावेतो मुा **केरूर** येथे स्वामींचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्तीत आसे विशेष **बेरू** बरोबर पत्र पाठविले ते पावले पावोन संतोष जाहाला राजश्री **गंगाधरपंत करंदीकर वाघधनचे** यास पत्रे पाठविली आहेत तीं लस्करांत पावती करून पावलियाचे उतर आणोन पाठवणे म्हणोन पत्रीं आज्ञा येसीयास मारानिले-चांस पूर्वीहि पत्रे आपण पाठविलीं होती ती मुजरद राा **सदासीव कान्हो** कारकून **बागलकोटकर** या समागमे माणसा बाा पाठविलीं होतीं परंतु कोठे ठिकाण लागले नाही बजिनस **सदासिव कान्हो** याचे पत्र आले तेच सेवेसी पाठविलें आहे त्या वरून श्रुत होईल हली **बेरू** समागमे पत्रे त्यास आली तीच देऊन बेरूसच लस्करांत पाठविले आहे त्याचो भेट होऊन पत्राचे उतर आलिया आज्ञे प्रा सेवेसी पाठवून देतो इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री—**भाऊ**साहेब फोज सुधा **धारवाडा** वर आहेत किल्यास मोर्चेबंदी केली आहे अद्यांप हस्तगत जाहाले नाही आतीलहि हिमत धरून लडत आहेत यावयासी महिना पंधरा दिवस पाहिजे सुती सामान व दोन च्यार साहाणा पाठवणेविसी लिा त्यास मागाहून पाठऊन देतो स्वामी कारणे मकर संक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत स्वीकारून सेवकास उतर पाठवावयासी आज्ञा असांवी बहुत काय लिा लोभ करावा हे विज्ञापना

राजश्री **रघुनाथराव** दादास साा नमस्कार विनंती लिा परिसोन लोभ करावा **गंगाधरपंता**कडे लस्करास पत्रे पाठविली आहेत उतर आल्यावरी पाठऊन बहुत काय लिा लोभ करावा हे विनंती

---

ले. ७३
पत्र क्र. ७

श्री

शं. १७१३ ज्येष्ठ वद्य ८ गुरुवार
इ. १७९१ जून २३

श्रीमंत राजश्री——— **तात्यासाहेब** स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक **गणेश कृष्ण [ गद्रे ]** कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ता छ २० माहे सवाल पावेतो माा **केरूर** येथे स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्तीत आसे विशेष आलीकडे पत्र येत नाही तर निरंतर आज्ञापत्री सेवकाचा सांभाल केला पाहिजे या नंतर पूर्वी **भिकाजी सिंदे** या समागमें येथील माणसाचा ऐवज पाठविला आहे तो पावलाच आसेल पावलीयाचे उतर आले नाही कृपा करून उतर पाठवावे वरकड कारकुनीचा ऐवज राजश्री **रामचंद्रपंत** आबा **श्रीमंता**कडून काल **बागलकोटास** आले आहेत येथील जमाबंदीचा ठराव जाहाली-यावर कारकुनीचा ऐवज घेऊन पाठवून देतो लस्करातून राजश्री **लक्ष्मणपंत जोग** मामा याणी स्वामीस पत्र व बैल तावडा कस १ येक म्हैस गाभणी येक येसी दोन पाठविली आहेत ती **नायेकजी संकपाल** खासबारदार व भावले **वेलणेश्वरकर** या समागमे पाठविली आहेत पावतील येथून वाटखर्ची बरोबरी रुा २ दोन दिल्हे आहेत कलावे राजश्री **लक्षुमणपंत** याणी वाटेस दिल्हे त्याचा झाडा येथवर जाला बाकी काही राहिले नाही माणूस आला तो आपला आर्ध रुा जाजती वैरणीस लागला आहे तो देणे म्हणोन मागत आहे श्वामी कारणे चंदन वजन ०॥८५। सवापाचशेर पाठविले आसे पावले घेऊन सेवकास उतर पाठवावे दक्षणेकडील वर्तमान तरी उतरे कडील फौजा सर्व **मोतीतलावर** आहेत **टिपू पटणा** पलिकडे च्यार कोसावरी आहे त्याचा पला भारीच आहे लस्करात महागाई बहुत आधोलीभर दाणे रुा मिलत नाही वैरण तो नाहीच येसा प्रकार आहे वरकड वर्तमान आधिकोतर नाही सदैव पत्र पाठवून साभाल करावा बहुत काय लिाा लोभ करावा हे विज्ञापना———

श्रीमंत राजश्री **रघुनाथरावदादास** सां नमस्कार लिाा परिसोन लोभ करावा हे विज्ञापना

---

## यशवंत महादेव खासनीस यांचा सरंजाम

ले. ७४

श्री

अवल इंग्रजी
अंमल

*यादी इनाम व सरजाम वगैरे कैलासवासी **येशवंतराव**[1] **माहादेव** याचे नावे चालत होते त्याची झाड चालत होते ते देह वगैरे

---

* पा. स. ११।७०. १ हे महाडास राहात. ह्यांजकडे रायगडची व्यवस्था शाहू छत्रपतींनीं तो गड खासगींतील म्हणून स्वतःकडे ठेवल्यामुळें सोपविली होती. व म्हणून हे खासनीस. ह्यांचे घराणें उरवडेकर पोतनीसांपैकीं.

९ इनामगाव ७ व जमिनी २

९२ सरंजामगाव व मोकासे वगैरे आमल गावगना

१ हासील **श्रीमाहादेव** जत्रा चैत्रमासची रु. ५००

१०२

ता। **रायगड** येथील इनाम व इसापत गाव धारबदी सेत व वतन देशपाडे कुलकर्णपणाचे

पौ पेशजी पेसवे कार्की(द)बार गेले ते देह वगैरे २४ बाकी **सवाई माधवराव पेशवे** आखेर चालत आले ते देह ७८ तपसील ९ इनामी ६९ सरंजामी / ७८

पौ आलीकडे सरजामी गाव व आमल गेले ते

१८ **बाजीराव रघुनाथ पेसवे** याचे कारकीर्दीत **सदासिवपंत भाऊ** व **चिंतोपंत देशमूख** यानी जफ्तीचे सनदेखेरीज घेतले ते

३४ कपणी सरकार आमलात मोगल सरकारचे सरहदीत कंपनीसरकारानी देऊन त्याबदल पेनसील दोन हजार करोन दिल्हे ते देह

५२

बाकी हली **मनोहर भीराव पोतनिवीस** याचे नावे चालत आहेत ते देह २६

तपसील

९ इनामी

| | | |
|---|---|---|
| ७ गावगना | १ | मौजे **करंदी** तर्फ कुडाल दरोबस्त ५०० |
| सातारियाकडे दोनी मिलोन आकार १५०० | १ | मौजे **वरबटणे** ता। नागोटणे स्वराज्य दरोबस्त |
| | १ | मौजे **निगडे** ता। नागोटण स्वराज्य दरोबस्त |
| कोकणात | १ | मौजे **नडोली** ता। अष्टमी दरोबस्त २०० |
| इलाखा पंत सचीव | २ | तर्फ मुठे खोरे दरोबस्त |
| | | १ मौजे **उरवडे** १२०० |
| | | १ मौजे **वेगरे** २५० |
| | | २ |
| जिल्हा पुणें | १ | मौजे **सांगवी** तर्फ पौडखोरे ६० |
| | ७ | |

२ जमिनी

इलाखा सातारा

१ मौजे **खरसी** तर्फ कुडाल येक १ १७५

१ मौजे **सोनगाव** तर्फ सातारा ·।· ९०

२ ।। चावर

९

१७

६ सोलापुराकडे

२ **सोलापूर** ९१७

१ **भंडार**कवठे

१ मौजे निमरगी

२

४ ता **बारसी** १२७५ १ मौजे **वाघोली** ४५०

१ मौ **येडसी** ३०० १ मौजे **काजले** ·॥· ७५

१ को **तडवले** ४५०

६ ४

३ नगराकडे १४५० १ कसबे **कोलगाव** २००

१ मौजे **चिंचोडी** ४०० मौजे **सांगी** ४०

मोगलाईत मौजे दादे**गाव** ६१ मौजे **भोगवली** तर्फ मेढे १५० सातारा ईा सातारा १ प्रांत कराड **सालसिरवे** अलिकडे जफ्त ३००

४ ता वरुण १४

१ मौजे **लोणी**, १ मौ **महूद** १ मो **लसणी येडके**

५

१७ जमिनी **दारगाव** चावर १७५

माहाडकडे कोकणात ४ इनामगाव १५०० १ किजलोली मौज १ किजलघर १ चाचिये मौजे १ कोल मौजे १ इसाकत दादवली देशपांडे व कुार्ण वतनाचा इनाम मलखेड ५० व खोती वगैरे हकदारी बा गावी ७५ गाव हकदारीचे १२ किंता ३ तिसरे साली वर्षली / १५

## पेशवे अमृतराव यांचा तोतया

ले. ७५ }
इंदापूर-देशपांडे }

श्री

{ श. १७०१-१२
{ इ. १७७९-९०

*सेवेशीं विनंति विज्ञापना जे **सिंगणापूर खोलापूराचे** संनिध कोसावर **पयोष्णीचे** तीरीं ........ आहे. तेथें खूळ आमृतराव श्रीमंत ——— दादासाहेब याचे पुत्र[1] म्हणून होते त्यांस आंतस्थें जागा जागां स्वार व पाये प्यादे यासी बोली चाली देणियाची करून लोकाचा जमाव आशाढ मासीं हारयेक जागा करून घाटमाथा चढोन दंगा करावा समागमें दोन लक्ष रुपये याच्चा हुंडीया व.कांहि जवाहीरही होतें येैसें वर्तमान परस्परें प्रगट जालियावर **गिरमाजीपंत** कमाविसदार खोलापूरकर दिमत सेनाधुरंधर यानें **अमृतराव** म्हणोन त्यांसीं धरिलें तेथें कजिया जाला उभयें पक्षीं चारपांच माणसें ठार जालीं व कांहीं जखमी जाली सेवटीं धरून खोलापूरचें कोटांत कैद केला आणि राजश्री सेनाधुरंधर यासीं पत्रें **नागपुरास** पाठविलीं आहेत तेथून आज्ञा येेईल त्याप्रो होईल त्यास जनमुखें येैकितों कीं हुजूर बोलाविलें आहे दुसरी वदंता कीं सोडून देणें आद्यापि नागपूरचें पत्राचें तथ्य नाहीं आमृतराव नामें करून धरिला आहे तो म्हणतो कीं मजला कायें म्हणोन धरिलें मी तर नवाब **निजामअली** याचें संदर्भानें व सेनाधुरंधर याचें सूत्रानें आलों आहे त्यापासीं पारसी कागदपत्रेंही आहेत येैसेहीं वदता आहे आम्ही ही खबर पकी आणून मागाहून सेवेसीं विनंतिपत्र लेहूं दुसरें या प्रांतातील आमचा स्नेही ग्रहस्त नागपूरीं सेनाधुरंधर याचे दरबारांत चाकरीस आहे त्यानें वर्तमान सांगितलें कीं दरबारांत आपल्या सातां गावची गोष्ट निघाली होती की श्रीमंत **आपा** कैलासवासी जाले ते आमचे गाव आहेत त्याचा बंदोबस्त करावा लागेल म्हणोन दरबारांत बोलत होते तें येैकिलें त्याप्रो ग्रहस्तानें सांगितलें त्यास आपण हमेशा राजश्री **कृष्णरावजी**[2] **गुणे** यांजकडून नागपुरास जासूद राजश्री **सदासिवपंत**[3] **दादा** वकील याजकडे जातात तर आपण आपलें नांवें व श्रीमंत राजश्री दादासाहेब व बापूसाहेबाचे नांवें सदासिवपंत वकील यासीं पत्रें लेहून बंदोबस्त करवावा आम्हांस जितकें वर्तमान कळेल तितकें सेवकानें लिहीत जावें दरबारांत मुत्सद्दी लोक घालमेल करावयासी चुकत नाहींत येक दोन वेळां गांवाविसयीं स्मरणें सेनाधुरंधर यासीं दिल्ही परंतु खाशानीं उतर दिल्हे नाहीं येैसें

---

* संमेलन ३७ वें. श. १८७२ १ रघुनाथराव दादा पेशवे ह्यांचे हे दत्तकपुत्र. इ. स. १७६८ ते १८२४. हे विद्यमान असताच ह्यांचा तोतया ! २ कृष्णाजी बल्लाळ गुणे. ३ हे कृष्णाजींचे पुतणे, रामजी बलालचे पुत्र. हे पेशव्यांतर्फे नागपुरांकडे वकील होते ( इ. १७७९-१७९० ). गुण्ये घराण्याचा वृत्तान्त पहा.

येकिलें म्हणोन सेवेशीं विनंती पत्र लिहिलें आपण धणी आहेत सेवकांनी सुष्ट दुष्ट येकिलें वर्तमान लिहितमात्र आसावें बहुत काये लिहिन विनाति

---

## तोतया यशोदाबाई पेशवे

ले. ७६
ग्वालेर–पिंगले संग्रह

श. १७५१ भाद्र. शु. १४
इ. १८२९ सप्ट. १२

*श्रीा विज्ञापना जे गंगाजळ **येसवदाबाई**† कैलासवासी सवाई माधवराव यांची स्त्री जे तोतया म्हणतात ती तिगस्ता लश्करांत आली होती ती येथें येऊन दोन अडीच वर्षे येथेंच आहेत त्यांणी येथें ब्राह्मण मंडळी चित्पावन यांजला सर्वास प्रार्थना केली जे मी खरी असता बुडते त्यास तुम्हीं ज्ञातगंगा आहां माझा वाका समजोन घेऊन माझी शुध्धता होय ते करावें त्यावरून ब्राह्मण मंडळी आनकूल होऊन सर्वांनी येकत्र बसून त्याजकडील साक्षी मुदे अैकोन खरे खोटे पाहत होते हे वर्तमान येथील अधिकारी यांस समजल्यावर त्यांनी बोलाऊन सांगितले जे याची तहकीकात देशात जाली आहे व याचे मालक हाकम आहे ते समई ज्ञातीवाले याणी उत्तर केले जे पद देणे व कबूल करणें न करणे हे आपले आधीन आहे परंतु ज्ञातीचा प्रकार व जातीची ही खरी किंवा खोटी हे ज्ञातीचे स्वाधीन आहे असे उत्तर करून स्तब्द होते बाईनी **कलकत्यास** कोणी कारकून पाठवून तेथे जाहीर केले जे ज्ञाती आमचा शोध करून आम्हास पावन करते तेथें होऊं पावत नाही त्यावरून तेथून परवाना आला जे बाईची तहकीकात देशी जाली आहे बाई खोटी जालीत परंतु त्याची ज्ञाती त्यास पावन करीते यांत कोणी अवरोध करूं नये त्यावरून येथें अधिकारी यांणी आपले कडील अडथळा ठेविला नाहीं ज्ञातीवाले मंडळी दोन तीनसे मिळोन आज भाद्रपद श्रुा १४ मंदवारी **बाईस** प्रायश्चित देहशुद्धीचे दिल्हे दोन अडीचसे ब्राम्हण यांस प्राचश्चित्ताची दक्षणा गोप्रदानें दर आसामास पांच रुपये प्रो आज बाईनी दिल्ही आतां तीर्थविधी व श्राद्ध येक दोन दिवसांस होणार असे अैकतो जाले वर्तमान सर्व ते श्रुत व्हावे येतदर्थ विज्ञापिले आहे पुढें होईल ते विज्ञापना लिाा सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

* पा. स. ३ श. १८७५ पे. द. ४१ ले. २६८, ३१९ ते ३२१ पहा.

† ह्या सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या द्वितीय पत्नी. मृत्यु रायगड येथें इ. स. १८११.

## छत्रपतीकडील दरबार व खाजगीकडील व्यवस्था आणि सण

ले. ७७ } श्री {

*छत्रपती स्वामिनी

यांदि दिा राजश्री सोन[1] ठाकूर बा जसोदीपणाचा[2] कायेदा येणेप्रा

प्रथम सिव्हासनी बसतां

| हाती | घोडे | सिरपाव खासा |
|---|---|---|
| १ | १ | १ |

होतु

५०००

प्रथम पुत्र राजश्री स्वामीस होईल तेव्हां घोडा सिरपाव होतु १०००

हाती १

दसरियास सिरपाव १

संवत्सर प्रतिपदेस सिरपाव खासा १

वसंत पंचमीची रंगाची वस्त्रे १

आमचे घरीं लेकरे होतील त्याची बारसा करावी गौरव करावा १

वरसामधे विराच्या ४ तल्या भराव्या त्यास चौस होतु ४ च्यार दक्षणा १ यो

मजलसीमधे उपाध्यायास पाने दिल्हे-उपर आपणास द्यावी १

स्रावणीस सोनेचे जानवे व दक्षणा १

उजवे बाजूस उभे राहावे अधी पाने आपणास द्यावी मग भाऊ भोसले यासी द्यावी म(ग) सोइरे यासी द्यावी १

दीपोछाव प्रतिपदेस ++ इकास वस्त्रे अम्हास सिरपाव

सिमगियास गुलाल अबीर फुलेल व रंगाची वस्त्रे १

वडील पुत्राचे स्वामीनी लग्न करावे तेव्हा द्यावे

| हाती | घोडा | सिरपाव |
|---|---|---|
| १ | १ | १ |

होतु १०००

१

राज्यात जमाई होईल त्याचा दशांस काढून अमचे हवाला होन स्वामीचे हजूर करावे यात दाहारु(वा) वाटा आपण द्यावा

पूर्वी थोरले कैलासवासी स्वामीनी गाव इनाम मावलामध्ये व कोकणामध्ये दिल्हे होत व काइदेपत्रे होती ते मुसे-खोरमध्ये हबसियाचे धामधुनेमध्ये जलाली मुखेद प्रमाणे ++ त्र हजर अहे आम्हां हाता हाते ते अहे

---

* पा. स. ५।७०. १ पुरं. द. ३ ले. १६३ पहा. २ जसोई = जोसीपणाचा ?

# जावली सुभ्यांतील महालकरी कचेरी

[ यमाजी शिवदेव हे प्रतिनिधींचे मुतालिक ब्राह्मणोली येथें राहात. यमाजी शिवदेव यांजकडे जावली प्रांत असतां तेथील महाल कचेरींत कारकून किती व कोण कोणच्या अधिकाराचे असत त्यासंबंधींचें हें सोबतचें टिपण आहे.

ह्यांत एकंदर ३ सुभे–सुभाप्रांत जावली, सुभाप्रांत व्याघ्रगड व सुभा मंगळगड कांगोरी हे—आहेत. ह्या तिन्ही सुभ्यांकडे 'सुभेदार,' 'मजमदार' आणि 'फडणिस' हे तीन अधिकारी प्रत्येकी आहेत. 'दप्तरदार' हा अधिकारी मात्र जावलीप्रांत कचेरी-कडेच दिला आहे सुभ्याच्या पोटीं ज्या तर्फा असत त्या प्रत्येक तर्फेकडे हवालदार, मजमदार व सरदेशमूख ह्या अधिकाराची माणसे कामदार असत. कांहीं ठिकाणीं सर-देशमुखीचें काम मजमदार यांजकडेच सोपविलेलें दिसतें. व्याघ्रगड सुभ्यांत पांच तर्फा व जावली सुभ्यांतहि पांच तर्फा आहेत. मात्र व्याघ्रगडाकडील तर्फांकडे हवालदार मजमदार सरदेशमूख हे तीन कामदार स्वतंत्र दाखविलेले नाहींत. आणि धणगर माहार म्हणून एक आणि जकातीची ठिकाणें २ पारघाट व आचवला तिंवरा ह्या जकातीकडे दोन कारकून व यमाजी शिवदेव यांच्या खाजगीकडील गांवाकडे एक आसामी मिळून एकंदर ३१ कारकून ह्या जावली प्रांतांतील माहाल कचेरींत असत. तीन सुभ्याच्या तीन कचेऱ्या मुख्य असत.

यमाजी हा इ. स. १७६३ मध्यें मृत्यू पावला. अर्थात् त्यापूर्वींचा ह्या कागदाचा काल धरणें प्राप्त.

यमाजी शिवदेवाचा मुलगा सदाशिव यमाजी म्हणजे गमाजी यमाजी. विठल सुंदर परशरामी हा यमाजी गमाजी ह्या दोघांचाहि व्याही. ]

लें. ७८ श्री {श. १६८५ पूर्वी
इ. १७६३}

यादी माहालकरी नेमणूक कारकून सुभा प्रांत जावली कारकीर्द रा। येमाजी सिवदेव आसामी कारकून

सुभा प्रांत जावली

१ सुभेदार
१ मजमदार
१ फडणीस
१ दप्तरदार
१२ ता। दार आसामी
८ घाट.

सुभा प्रांत व्याघ्रगड

१ सुभेदार
१ मजमदार
१ फडणीस
५ ता।दार
१ तां।रा बाम्हणोली

३ जोरखोरे
१ हावालदार
१ मजमदार
१ सरदेशमुख
३
३ तां चारामुरे
१ हावालदार
१ मजमदार
१ सरदेशमुख
३
२ तां कडेचे
१ हावलदार
१ मजमदार
२
२ तां सालरो
१ हावालदार
१ मजमदार
२
देखील सरदेशमु[ख]
२ तां आटेगाऊ
१ हावालदार
१ मजमदार
२
१२
१६
सुभा मगलगड कागोरी
१ सुभेदार
१ मजमदार
१ फडणीस
३
येणेप्रमाणे आवश्यक वतन चालवीत होते*

१ तरफ तांबा
१ तां हेलवाक
१ तळवटी ता
१ तां दाहापटी चीपळूण
माहाल बाबती——
५

८

कीता कारकून
१ धणंगर माहाल
२ जकाती दार
१ पारघाट
१ आबवला तीवरा
१ सीवाये खा(स)गी गाव आा
४

तेरीज येकंदर
१६ सुभा प्रांत जावली
८ सुभा व्यांघ्रगड
३ सुभा कागोरी माहा-
वल सिवाये गड
४ किता आा
३१

---

* पा. स. १३।७४

## जनकोजी शिंदे गोवलकुंडा किल्ल्यांत कैदेंत

ले. ७९ } श्रीराम { श. १६९७ फाल्गुन वद्य ५ / इ. १७७६ मार्च १०

*पैवेस्ती छ १९ माहे सफर ( श. १६९८ चैत्र वद्य ५ = १७७६ एप्रील ९ ) सन ११९० हिजुरी मंगळवार

राजश्री [1]**धोंडोपंत रायराया** गोसावी यांसि

छ श्री सर्व उपमायोग्य अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान——श्री [2]**जनकोजी सिंदे** दंडवत विनंती उपरी येथील क्षेम ता छ १९ मोहोरम पावेतो मो **हैदराबाद** किले **गोलकुंडा** सुखरूप असो यानंतर तुम्हाकडील वर्तमान बहुत दिवस जाहले कळत नाही ऐस नसावे स्नेहाची अभिवृधी करावी श्रीचे कृपेकरून येजमाणाची रुपा तुम्हावर आहे पूर्वी तुम्ही आम्हासी बो(ल)ला होता ते गोष्टी विसरला की काये ज्या ग्रहस्तान आम्हावर निरदया केली होती तो निवरतला तो होता ते समई आपल्यासहि संकटच होत आतां सर्वस्व आपले खेरीज दुसरा विचार नाही ऐस असता आमच स्मर्ण तुम्हास होत नाही हे अपूर्व आहे प्रथम भेटी तुमची आमची जाहली ते वेळेस तुम्ही येकांती बो(ल)ला जे या ग्रहस्तामुळे माझा उपाय नाही आम्ही तर उभयेता बंधु सर्वस्व तुमचे आहो त्यास आता तुम्हाखेरीज दुसर कोन्ही नाही आता प्रसंग आहे जे कराल ते श्री तुम्हास यश देईल आम्हो तर सर्वस्व तुमचे आहों पूर्वी जे वचेण दिल्हे आहे ते सत्य आहे घर दवलत तुमची आहे ममता न सोडावी श्रीकृष्णाची व सुधामाची गुर(रु)चे घरी विद्या अभ्यास करिता ते समईची मैत्रिकी होते त्यास श्रीभगवंत सुवर्णाची नगरी करून दिल्ही राजाच म्हणविल त्या प्रो आम्हास आपण ब्राह्मण देवाचे ठाई आहा आजी-पावेतो अज्ञातवास भोगला आता येथून विमोचण होयेस कराव राजश्री **कानोपंत** येथ तीन वरस होते तुम्ही रुपा करून यास सोडवील आतां सेवेसी आले आहेत आमच वर्तमान सागता विदित होईल आपली भेटी जाहली ते दिवसी बाजी खिजमतगार जवळ होता तोच पाठविला आहे मुखवचेणी सांगता चितास आणाव सर्वस्व आम्ही तुमच आहो दुसरा विचार नाही जे कराल त्यास आम्ही अंगिकार आहो तुमचे हाताखाली बाजी आहे कराल ते थोड आहे आता मागपुढं पाहू याल तर तुम्हास श्रीची शेप्त आहे बहुत काय लिहू रुपा करावी हे विनंति

---

* पा. स. १०।७३.

१ हे हैद्राबादकर निजाम दरबारांतील सुप्रसिद्ध दफ्तरदार व नायब दिवाण घराण्यांतील. ह्यांस रायरायान् दयावंतराव हा किताब होता इ. १६२८–८३.

२ प्रसिद्ध जनकोजी शिंदे ( मृ. १७६१ इ. ) ग्वाल्हेरकर ते हे नव्हत.

## जंजिरेकर शिद्दी व पेशवे

ले. ८०
डे. कॉ. रु. ७९ } श्री { श. इ.

श्रीमंत राजश्री——**नाना** स्वामीचे सेवेसी

*पोष्यांतर्गत **भिकाजी गोविंद** मुक्काम **मुरुड** कृतानेक साष्टांग नमस्कार ताा छ ४ जिल्हेज पावेतो स्वामीचे रुपेकरून क्षेम असे विशेष मोह्याची शाहाळी सुमारे १० सेवेसी पाठविली आहेत पावलीयाचे उतर पाठविले पो **जंजीरकरानी** बांदे सरकारतर्फेची सोडून मजकडे मुरुडास पाठविली याचा मजकूर विसापूरकर कागदी याजबराबर सेवेसी लिहून पाठविले आहे त्यावरून सविस्तर विदित होईल रा **माधवराव वेलोसे** याजकडील तिघी बायका अद्यापवर मजकडे जंजीरकरानी पाठविल्या नाहीं त्याचे उत्तर करित आहेत की याचा जाबसाल निराळा आहे त्याचे उतर मी करितो की तुम्हास सरकारासी सलूक करणे त्या अर्थी निराळे जाबसाल तुम्ही लावल्यास श्रीमंत तुम्हासी उत्तर कसे करतील हे पाहावे दोन दिवस बोहून धरले आहे तीही मजकडे पाठवितील जंजीरकराची बांद सरकारचे तालुक्यास आहेत त्याच्या सनदा मजकडे पाठवाव्या म्हणोन पेशजी हि लिहिले आहे त्याप्रमाणे पाठविल्या पो सरकार-तर्फची बांदे **बिरवाडीस** सरकारांत तालुक्यात जातील तेव्हां सरकारचे तालुकदार यासी मी पत्रे लेहून पाठवीन की बांदे जंजीरेतर्फेकडून सुटोन बीरवाडीस गेली तर जंजीरे तर्फेची बांदे असतील ती सोडून देणें पेशजी अकरा तालुक्यास सनदा पाठवाव्या म्हणोन याद पाठविली आहे त्यास सनदा पाठवाव्या कीं सरकार तर्फे बांदे असतील ती सोडून प्रमाणे तालुकदारास सनदा पाठविल्या पाहिजेत पहिला जंजीरेकरासी सरकारचा करार को सरकारची वतने देशमुखी सुधा चालती करावी बांदे दुतर्फा सोडावी अकरा महाली दुतर्फा अमलदार बसवावे तेव्हा रुजुवातीचे ऐवजी नवद हजार रुपये द्यावे उपरात रुजवाज करावी याप्रमाणे करार त्यास जांजिरेकर आडेवेढे फार घेत होते हाली म्हणतात बांदे आम्ही सोडली तुमचे तालुकदारास सनदा याव्या म्हणजे आम्ही बांदे सोडून देणे या बीरवाडीस पाठवू उपरात जंजीरे तर्फेची बांदे सोडावी श्रीमंतास जंजीरेतर्फे कडून पत्र सनदे दाखल द्यावे की देशमुखी वगैरे वतने आर्चापासून चालवा-वयाची करार केली आहेत याप्रमाणे श्रीमंतास पत्र द्यावे स्वामीनी सरगुमस्ते देशमुखीचे पाठवावे बराबर वतन समधे कारकून माहालो माहाली ठेवणे ते पाठवावे त्याच बराबर ऐवज नवद हजारोपैकी ऐंशी हजार व **सुवर्णदुर्ग**पैकी दरसाल पाव(त) असतात ते ताा सलास बाकी निघेल तो ऐवज **बीरवाडीस** पाठवावा देशमुखीचे कारकून माहाली बसोन देशमुखी चालती जाहाली म्हणजे ऐवज द्यावा रुजवातीस कारकून यावे

* पा. स. ९। ७०

रुजवात चालती करावी उपरात अकरा माहाली दुतर्फा कमावीसदार बसावे याप्रमाणे बोलणे जंजीरेकराचे आहे मी उतर करितो की पहिले कराराप्रमाणे तुम्ही करावेत पैका मजकडून घ्यावात याप्रा उतर आहे परंतु त्याचे बोलणे आइकल्यास आपले काही जात नाहीं परंतु त्याचे बोलणे ऐकलें असे होते याजकरिता त्याचा संतोष तो आईकला पो पैका स्वामी बीरकडीस पाठवितील तो विना देशमुखी चालती जाहाल्याखेरीज देणार नाहीं सविस्तर अर्थ विदित असावे म्हणोन लिहिले आहेत तूर्त बांदे सोडाव्याविशी सनदा मात्र पाठवाव्या देशमुखीची सनद त्यानी दिल्यावर सेवेसी लिहून पाठवीन तेव्हां ऐवज पाठवावा ऐवजाची तरतुद करून तयार ठेविला पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

## साटेलीचे मणेरीकर व परमेकर देसाई

ले. ८१ } मणेरीकर–संग्रह } श्री { श. १७७५ मार्ग. व. २ { इ. १७९३ डिसें. १९

लावण चिठी राजेश्री **मायेगावस देसाई** ता **मणेरी** ता वेदमुहूर्त राजेश्री **रघुनाथभट** सुा आर्बा तिसेन मया वं आलफं तुम्ही सांगितले जें मौजे **सांटेली** येथे चाल ठिकाण आहे ते यावें कमाविसी करून वसूल देऊ त्याजवरून ××( फाटले ) आणून मख्ता खड रुा × पाच रुपयेस दिल्हे आसे माड व फोफल [ वगैरे ] हर जिनस से(ता)मधे कराल त्यास इकडून अतर पडणार नाही साल दरसाल सदरहू ठिकाणं ×× ( फाटलें ) जाणिजे रवाना छ १५ माहे जमादिलावल *रुजु

बार

---

ले. ८२ } श्री ओणवा[1] { श. १७१५ मार्ग. व. २ { इ. १७९३ डिसें. १९

वेदमुहूर्त राजेश्री **रगनाथभट मणेरकर** गोसावी यासी रनो **मायगावस देसाई** ता **मणेरी** दंडवत विनंती सुा आर्बा तिसैन मया आलफ मौजे **साटेली** येथील ४ ठीकाण चाल सीमाधार घालून गावकर मौजे मजकूर यांणी मखता कदुबाण रुा ५ पांच रुायस करार करून दिले असे तेणे प्रा तुम्ही ठिकाणची उस्तवारी करून

---

१ 'ओणवा' हें परमेकर देसाई यांचें कुलदैवत. रग–नाथ ह्यांतील 'रग' रंगनाथ ह्यांतील नसून रघु–रघ–रग याप्रमाणें रघुनाथ ह्यांतील आहे.

* पा. स. ११७०

ठिकाण तुमचे वौंशपरंपरेने भोगावे व आमचे वौशपरंपरेनें पालावे म्हणोन लिहून दिला पटा संई सद्रहू ठिकाण मजजारो (मजकुरा) हर जिनस कराल तो कटुवाणामधें भोगावा जाणिजे छ प्रमादी नाम छत्छरे शके १७१५ छ १५ जमादिलावल

---

ले. ८३ } श्री { श. १७१५ मार्ग. व २ / इ. १७९३ डिसें. १९

वेदमुहूर्त राजेश्री **रगनाथभट** मणेरकर स्वामींचे सेवेसी सेवक **मर्त धरणा** व **पुन धरना** व **तुफ धरणा** व **भीव फडता** व **रग धरणा** व **तार धरणा** गावकर मौजे **सांटेली** ताो **मणेरी** दंडवत विनंती सुा आर्बा तिसेन मया आलफ मौजे मजकूर पैकी ठिकाण आंम्हास कटुवाण करून देणे म्हणोन तुम्ही येऊन सांगितले वरून ठिकाण चाल हे मखता कटुवाण रुा ५ पाच रुायेस करार करून दिले आसे त्याची चतुरसीमा पूर्वदिशा निशाची सीमा १ पछीम दिशा बादाची सीमा १ उतर दिशा चालीची सीमा १ दक्षण दिशा पाणलोटाची सीमा १ येणेप्रा चतुहुर सीमानी ठिकाण दिले आसे तुमचे वशपरपरेने भोगावे व आमचे वौशपरपरेने पालांवे म्हणोन लिहून दिला कटुवाण पटा सई छ. १५ जमादिलावल हरजिनस कराल तो कटुवाणामंधें भोगावा॥

ग्रामाची वोप

(तलवारीची निशानी)

---

## सखारामबापूंची मुलाखत

[ सोबतचें पत्र मंडळ संग्रहांतील आहे. हें कोणी कोणास लिहिलें आहे हें समजत नाहीं. लेखकानें बापूंची मुलाखत त्यांच्या हिवरे गांवीं घेतली आहे. मुलाखत विशेष महत्त्वाच्या राजकारणीं घटणेसंबंधीं दिसते. यांतील दादा म्हणजे राघोबा दादा असावेत. या वेळीं दादांचा मुक्काम नेवाशास असून त्यांजवळ कोणी बालकृष्णपंत नांवाचा मनुष्य असावा. बालकृष्णपंत हा बापूंचा प्रतिस्पर्धी दिसतो. हा बालकृष्णपंत कोण हें समजत नाहीं. आणि ते उमगल्याखेरीज मुलाखतीचा विषय स्पष्ट होत नाहीं. दादा बापूंना दिवाणगिरीची माळ गळ्यांत घालण्याबद्दल नेवाशास बोलवीत तर नसावेत ! हें पत्र महत्त्वाचें खरें पण त्याची स्पष्टता होण्यास प्रत्यंतर-पुराव्याची जरुरी आहे. ]

ले. ८४ } { श.
इ.

सेवेसी सा। नमस्कार विनंती आजी प्रातःकाली राजश्री **बापूकडे हिवऱ्यास** गेलो तेथे समक्ष गाठ घातली परंतु त्याचें उतर येकच की राजश्री **बालकृष्णपंत नेवाशांत** आहेत तोपर्यंत मजला काही तेथे यावयाचे नाही मी बोलिलो की आपण **पुण्यात दादाचे** समक्ष कबूल केले असतां आतां ही गोष्ट सांगतां त्याचे उतर त्यानी केले की मी नाहीच म्हणत गेलो असे आसता त्यानी ही गोष्ट मजला देणेसनई मी बोलिलो की मर्जी आपली परतु कबूलच केले असे जाले नाहीं त्याउपरी **रामजी**-समागमे चिठी व **कुशाबा**समागमे निरोप पाठविला असतां तुम्ही का आला आम्हास काही **नेवाशा(स)** यावयाचे नाही म्हणौन साफ सांगितले हे विनंति†

---

## रामेश्वरभट यांचें निर्याण

[ थोर भगवद्भक्त देहूकर श्री तुकाराम महाराज ह्यांचें सत्पुरुषत्व मानणारे व संत बहिणाबाईनी ज्यांना योगी म्हटलें आहे त्या रामेश्वरभट वाघोलीकरांच्या देहावसानाची माहिती, त्यांचे धाकटे बंधु दादो कान्हो ह्यांनीं पुढील पत्रांत लिहून ठेविली आहे. पत्राच्या प्रारंभीचा व शेवटचा कांहीं भाग फाटण्यांत गेला. मिळालें तसें पत्र पुढें दिले आहे. ]

ले. ८५
बहुळकर–संग्रह } × × × × × { श. १६४७
इ. १७२५

**त्र्यंबकेश्वरा**पासी **वाघोलीस** जावे ऐसा हेत धरून [1]**मोरयास** बोलावून आणिले त्याबरोबर वाघोलीस गेले अश्विनमास कमिला संत हरिदास गोळा करावे ऐसा हेत धरून **तुकारामबावांचे** भाऊ **कान्हावा गोसावी सुदुंबरेस** राहत होते त्यास बोलावणेस वाघोलीचा . पाठवून आणिले. **अवसरीस हेगावा** गोसावी कानडा त्यासही बोलाविले आपण आपला पुत्र [2]**रामचंद्र** बराबर घेऊन वाघोलीस गेलो **विठ्ठलभट उपाधे** पुराणीक व हेमाजी गोसावी **लोहगावी**हून आणिले मलेगले गावीचे **मोरया सोनार** व त्याचा पुत्र **विठोबा हरदास** होते प्रतिदिवशी कथा मोहोत्साह होत असता तीन दिवस अनशन व्रत घेऊन कार्तीक शुा येकादसीस चार प्रहर रात्रीं कथा येकोन हरिदासास म्हणो लागले कीं आपण हरी म्हणतो उठोन देव ग्रहान गेले देवास दुधाचा नैवेद्य समर्पून सेष दुग्ध उरले तें आपला पुत्र रामचंद्रास दिधले आपले मांडीवर डोई ठेऊन राम म्हणून देह ठेविला तोचि हरिदास कथा करीत टालमृदंग सहवर्तमान गावकरी समस्त मिळोन वाघेस्वरतळियाचे कांठी दहन केले तेधवा

---

† पा. स. ९१७३ १ हे रामेश्वरभटांचे चुलत पुतणे. २ हे सखे पुतणे.

**गणेशास**[१] पहिला पुत्र **गोविंद** पहिला पुत्र बारा दिवसांचा होता बारसीयाची आईत केली होती त्यासी भट गोसावी यांचे सुतक पडिलें म्हणून बारसे राहिले दुसरे दिवशी अंगे धोऊन आपला पुत्र रामचंद्र व आपण बहुलीस आलो मोरयाची वासना कीं

ण आचरावी आपण*

निषेध चा पुत्र त्यापासून उत्तर

वां आपला पुत्र रामचंद्र

भट गोसावी मेलीयावर रमा वाद (अपूर्ण)

---

## रामेश्वरभटांची मूळ माहिती

[ ह्या कागदांत रामेश्वरभट ह्यांना बहुळ वगैरे गावांची आजोळची जोस-कुळकर्णपणाची वृत्ति कशी मिळाली व ह्यापुढें सर्वस्वाचा त्याग करून ते अळंदीस आयचित वृत्तीनें राहूं लागले ती माहिती, त्यांचा धाकटा भाऊ ( दादंभट ) सांगत आहेत. तसेंच राघो बल्लळ अत्रे व निराजी राहूजी हे शिवाजी राजांचे मोठे अधिकारी ह्यांचा व ( कोटी ) लिंगार्चनाचा उल्लेख पुढील पत्रांत आला आहे. ]

**ले. ८६** { श. १६४७
बहुळकर-संग्रह } { इ. १७२५

गणेशाची[१] नसतां × × × × × आपणास हगवण लागली **मोरो खंडेराया** पुढें आपले काहीं न चले ( मग जरुर नाइलाज ) होऊन जोरावरीनें आपणापासून **गणेशास** कागद लेहून दिधला कीं मौजे **बहूळ** व **चिंचोशी** व **सिदेगव्हाण** हे तिन्हीगाउ आपलिया ( मामीयाचे ) ते **रामेश्वरभट** आपला वडील त्यासी दिधले तें जोड वृती रामेश्वर भटाची त्याच्या बापास व माउस-भावास वृत्तीस समंध नाहीं तेथे चुलत भावास काये समंध आहे पूर्वी रामे-श्वरभट तिन्ही गावीची वृती चालवून असता त्याची आपली मावसी गाउ **मान-गावी** दिधली होती तिचे नांव **कोंडाई** तिनें आपले लेक **षामजी** व **रखमाजीस** बरोबर घेऊन बहुलास आली ते म्हणो लागली कीं आपलीया बापाची वृती असता तूं आपली बहीण **चांदाई** व तुझा लोक **रामेश्वरभट** बापाचे व भावाचे वतन खात आहे तरी आपलिया ही लेकांस वाटा देणें म्हणून आपले आईस व भावास हगामा केला त्यावरी पांच गाव समाकुल पांढरी मेलविली मौजे बहुल व मौजे चिंचोसी व मौजे सिदेगव्हाण व मौजे **कोयेली** व मौजे **पिंपळगाऊ** ऐसे पांच गाउ मिळोन थल कसबे **वाई** नेमून दिधली तेथे चिरपत्र देऊन कोंडाई मावसी व

---

१ हे सख्खे चुलत भाऊ. * पा. रु. २११७२

तिचे लेक: षामजी व रखमाजी आग्रवादें याबराबर रामेश्वरभट देऊन वेव्हार सांगावयास वाईस पाठविले तेथे पिसाळ देशमुख व सभा प्रसस्न कीं उभयेता वादी याची उत्तेरे मनास आणून निश्चय केला कीं पांचा गावासीं सडी पाठवावी तेथून सडीचा जबाब येईल त्याप्रमाणें खरे खोटे करून वाटे लावावे तेथून बहुळास आली कीं आपले पूर्वज स्मरोन धर्मता सत्य लेहून पाठविणें त्यावरून पाच गाऊ यानी सडीचा जाब लेहून पाठविला कीं पूर्वज स्मरोन सत्यवादे लिहिले असे कीं हे वृत्ती **दामोदरभट जोसी** व त्याचे लेक **गुंड** जोसी याची वृत्ती परंपरागत होती त्यासी गुंड जोसी यास संतती झाली नाहीं याबदल त्याची वडील बहीण **चांदाई** तिचा पुत्र रामेश्वरभट त्याची मुंजी बाघोलीस जाली होती त्यासी आणून पांच गाव साक्षी करून आपला भट रामेश्वरभट त्यासी दिधली रामेश्वर भटाचा बाप **कानभट** त्यासी ये वृतीस समंध नाहीं व सखीया भावास समंध नाहीं तेथे माउस भावास समंध कैचा थैसे वर्तमान ये वृत्तीचे आहे तर तुम्ही धर्मपरायेण धर्मात्मे आहां न्याये थैसा आहे थैसे पत्र वांईस लेहून पाठविले त्यावरून कोंडाई आपली माउसी व तिचे लेक षामजी व रखमाजी आपले माउस भाऊ खोटे करून रामेश्वर भटास खरे करून जये पत्र लेहून दिधले ते घेऊन रामेश्वरभट व माउसी व माउस भाऊ बहुळास आले लागला लाग वेचला वेच खोटिया पासून घ्यावा थैसा तह केला होता त्यासी माउसीपासी पैंका नाहीं मग तिने आपले काप रामेश्वरभटास दिधले त्यानीं **आळंदीस** समाराधना केली माउसी व माउस भाउ बाहेर घातले रामेश्वरभट वतन चालउ लागले कोयीही आपल्या वडीलांची होती ***सालवाई कासार** मोकदम मौजे कोयेली बहुळीहून जावयासी वतनदार तिथी मिती सांगावयांसी ब्राम्हण न्यावे म्हणून **पिंपळगावीहून तिमण भट** व **राज भट** दोघे भाउ सुख वस्तीनें ठेविले त्यासी जोतिश व कुलकर्ण दिधले नाहीं परंतु बहुळीहून ब्राह्मण मिरासदार न पवे मग तिमणभट व राजभट कोयेलीचे वतन चालवू लागले बहुळी **बरवोजी आरेकरा**च्यामुळे **चव्हाण** कुणबी दहा पांच वरसे तिन्ही गावींचे कुलकर्ण करीत होते रामेश्वर भट **खडकीस** जाऊन आहुदी आणून गांवी गोत समाकुल मेळऊन चव्हाण खोटे केले त्यासी आस्तान्याचे पाठी गुरव सेत गाइकवाडाच्या थळपैकीं गुन्हेगारी कुणबावा लाविला रामेश्वर भट तिन्ही गावींचे वतन चालऊ लागले कोयाली ब्राह्मण **ब्रम्हे** त्याकडे गेली म्हणऊन कोयेलीची निसरसांडी केली **बापुजी त्रिमल** रामेश्वर भटाचा सिश्य झाला म्हणून कोयेलीची सांडी केली तिहीं गावीचे वतन चालऊन होते त्यावरी योगभ्रष्ट जन्मांतरे करून वीतराग प्राप्त जाला आयाचित वृत्तीनें आळंदीस राहिले[1] वतन चालवावयास कोण्ही नाहीं त्यावरी [2]**सोन पाटील सावळा** आळंदीस जाऊन भट गोसावी यासी बोलिता कीं तुमच्या मामानें तुम्हास वतन दिधले आणि सांडी करून गोसावी जालात व वतन चालवावयाचा काये विचार केला ते वेळेस आपण **संभाजी**

---

१ अदमासे श.१५१७ घाट. ९ २ बहूळचा पाटील. * साळवी हें ह्याचें रूप सांप्रत रूढ आहे.

[1]**बलजी भोसले** या पासी चाकर होतो तेथे रामेश्वर भट व सोन पाटील साबळा येऊन चाकरी टाकउन बहुळास आणून तिहीं गावींचे वतन आपले सांभाळी केलें आणि आपण आळंदीस गेले आपण तिहीं गावींचे वतन चालविले रामेश्वर भटाचा पुत्र **विठोबा** त्यासी भट गोसावी म्हणो लागले कीं तुवा हे परमार्थ वृती रक्षून आपणापासी असणें ते वृती दादोबास दिधली परंतु विठोबा म्हटले नाइके आपणापासी आला तरी हे वृत्ती रामेश्वरभटाची असतां **गणेश गोविंद** आपला चुलत भाऊ त्या काये समंध आहे थैसे कितेक सविस्तर वतनाचे वर्तमान **मोरो** [2]**खंडेराऊ** आा देशमुख व **मल्हार केशव** आा देशपांडीये व गावींचे मोकदम **कावजी** पाटील व **सेटीयाजी** पाटील समस्त यासी सांगितले ते वेळी **संभाजी गोविंद अत्रे सासवडीचे** देशकुलकर्णी यास खेड तरफेचा हवाला होता त्यानीं मोरो खंडेरायासी सांगितले कीं तुम्ही पाप वर्तणूक करिता धर्मता न्याये करीत नाहीं आपणावरी जुलुम जोरावरी करून **मोरो आबाजीचे** लिहिले व त्याचा भाचा **राघो** [3]**रंगनाथ** जवळ होता तो अभिमान धरून आपला पुतण्या रामेश्वर भटाचा पुत्र विठोबा जवळी नसता गणेशाची पाठी राखोन आपणापासून कागद लेहून देविला कीं सा मण सा टके दरसाल देत जाऊ त्यावरी गणेश व राघो रंगनाथ वाघोलीस गेले आपणास खोटारा करून गावास आणिले परंतु आपण गणेशास येक रुका अथवा येक दाणाही दिल्हा नाहीं त्यावरी कित्येका दिवसां वाघोलीस पैका व वाटा मागावयासी गेलो तेथे मोऱ्याने गणेश उभा करून **चिंचवडास** पाठविलें **नारायण**[4] **गोसावी** बोलिले कीं खेडचिया तहाप्रमाणें वर्तणूक करणें म्हणवून कागद करून देवाविला परंतु आपण येक दाणा अथवा येक रूका दिल्हा नाहीं त्यावरी कितेकां दिवसां **राघो बलाल अत्रे** सुभेदार असतां **इंदोरी तळे** गावीहून **पुरंधरास** जाता वाघोलीस राहिला तेथे मोरयानें व गणेशानें अतीथ्या करून आपली फिर्यादी करून बहुलचं वर्तमान सांगितले पंत म्हणो लागले कीं आपण पुरंधरीहून येतां गणोबास सांगाते घेऊन जाईन त्यावरी पंत पुरंधरीहून येतां अतीथ्या करून मोरयानें गणेशास निरऊन हाती दिधले त्या बराबरी तळेंगावांस आला ते वेळेस आपला पुत्र **रामाजी** तिहीं गावाचे कुलकर्ण करीत असतां रसद घेऊन इंदोरी तळेगावास सुभेदारांपासी गेला तेथें रसद सारून हुजती घेत होते पंत आपल्या पुत्रास म्हणो लागले कीं गणेश गोविंद वाघोलीहून तुम्हावरी फिरीयाद आला आहे तर तुवा आपला बापा दादावा व आपला चुलत भाऊ विठावा यासी घेऊन आलास तरी बरें नाहींतर पाच होन मसाला करीत त्यावरी आपला पुत्र आपणापासी येऊन गणेशाचे वर्तमान सांगितलें मुदती चौं दिवसाची केली आहे अधीक येक दिवस लागलियां होन पांच मसाले होईल तरी तुम्ही दोघे जण व आपण थैसे तिघे ३ तिघेजण सुभेदारापासी जाऊन

---

१ ह्या बालाजीचा उल्लेख शि. भा. अ. २५ श्लो. ४८ मध्यें आला आहे.
२ कागदाचा प्रारंभ पहा. ३ खळदकर. ४ देव.

त्यावरून आपण व आपला पुतण्या विठोबा व आपला पुत्र थैसे पंतापासी आले **लिंग समाप्त** झालीयावर रात्री पुराणसमई **विश्वनाथ** भट दीक्षित पंतांचे व्याही जवळ असतां गणेशास व आम्हां तिघा जणास बोलावून आणिले तेथे वादवेवाद भांडण लाविले तेथें पंत बोलिले कीं खरा होईल त्यानें हरीखी होन २५० अडचिसे द्यावे खोटा होईल त्यानें गुन्हेगारी होन ५०० पांचशे द्यावे थैसा हुकुम जालीयावरी आपण कतचा ल्याहावयास लागलो इतकियांत आपला पुत्र रामाजी त्यानें कागद हातीचा घेऊन फाडिला आणि म्हणो लागला कीं गणुकाका आपला चुलता परगोत्री नव्हे त्यासी जे स्वामी देववितील ते देईन हारिखी गुन्हेगारी घ्यावयासी गाव विकिले तऱ्ही फिटेना थैसी पंतास बहुत विनंती केली त्यावरून पंतीं खेडीचा कागद रद करून दहा मण दहा टकी याचा कागद आपणापासून करून देविला तो कागद गणेश वाघोलीस गेला आपण व विठोबा व आपला पुत्र रामाजी बहुलास आलो थैसा राघो अन्यानें आपणावरी जुलुम केला तरी त्याचा वंश वाडनार नाहीं त्या तागाईत गणेषास आपण येक दाणा अथवा येक रुका दिल्हा नाहीं हाली मौजे वाघोली व भावडी येथील जोतिश व कुलकर्ण येथा विभागें खाणें गजेशास येकंदर बहुलास समंध नाहीं मोरो खंडेराउ देशमूख ता **खेड** याचा *सोयरा **मोरो अंबोजी** यानें वाघोलीहून कागद व आपला भाचा **राघो रंगनाथ खळदकर** गणेशाचराबर देऊन खेडास पाठविले त्यावरून मोरो खंडेराचे वेव्हार सा महिने सांगोन गणेशाची पाठीराखोन जुलूम करून जोरावरीनें गणेशास सा मण सा टकीयाचा कागद लेहून देविला तरी त्याचे निसंतान होईल व वंष वाढनार नाहीं घ राघो बलालें मोरो आंबाजीचे निरवर्णेवरून गणेशाची पाठी राखोन आम्हासी दावा करून त्याचा व रामेश्वरभटाचाही दावा होता चाकणेस राघो बलालास पूर्वी हवाला होता ते समई रामनवमीची सामग्री **जुन्नर वोतूर नारायणगाऊ** वगैरे येथून आळंदीस येत असता चाकणेस राघो बलाल जकाती घेत होता तो दावा धरून त्यासी फजीत **निराजी राउजी** व दासोपंत करीत होते तो द्वेष धरून खेडीचा व चिचवडीचा कागद फाडून जोरावारी करून दहा मण दहा टकीयाचा कागद करून गणेशास आपले मुद्रेनिसी लेहून देविला तरी त्या राघो बलालाचे सर्वथा कल्याण होणें नाहीं वंष न वाढे निसंतान होईल व मोरो आबाजीने इतकी कली लाविली त्याचेही कल्याण होणें नाहीं गणेशपासी दाहा मण दहा टकीयाचा कागद राहिला आहे तो आपणास सेल्य आहे वंसी कोण्ही निर्माण जालीयास त्यापासी चांडाल पत्र आहे ते घ्यावे आणि भट गोसावी यांचे वृतीचे लांछन तोडावे पुढेही त्याचे वृतीस लंछन कलंक लावील तो चांडाल त्याचे कदापि कल्याण होणार नाहीं आपणास मृत्यसमई आधी लागला म्हणून लिहून दिले आहे

---

* रामेश्वरभटांचे चुलत पुतणे.

[ रामेश्वरभट गोसावी कितव्या वर्षी रामरूप झाले त्या माहितीचा कागद. ह्या कागदाचा लेखक सिवाजी राम व माहिती सांगणार, त्यांचा पुतण्या रामचंद्र दादोबा ]

ले. ८७ } श्री { श. १६४७ ज्येष्ट शु. २
बहुळकर-संग्रह } { इ. १७२५ मे ३

सके १६४७ विश्वावसू नाम संवछरे जेष्ट सुध २ ते दिनीं वंशावली परंपरा कुलकर्टी वंशावल लिखिते रामाजी दादाजी जोसी कुलकर्णी मौजे बहुल वगैरे आपलिया वडिलास आंदण वतन प्राप्त जाले संवचा बितपशील

| | |
|---|---|
| रामेश्वर भट | भाऊ अंतोबा उमर |
| ९० उमर[1] वरसे | ८५ वरसे (श. १४९७ ते श. १५८२) |
| ७० क्रमलिया वरे | ६५ क्रमलिर्दा वरसे |
| १६० | १५० |
| १३ क्रमले तेधवां आपणास वरसें | १८ क्रमले तेधवां आपली उमर वरसे |
| तिसरा भाऊ दादोबा | आपली उमर जन्म काल शके १५६५ सुभान नाम संवछरे कार्तीक शुा ५ जेष्टा नक्षत्र त्या देवसापासून हा काल-परियंत उमर वरसें ८३ आहे |
| ९० उमर वरसे (श. १५०७ ते श. १५९७) | |
| ५० क्रमलिया वरसें | |
| १४० | |
| ३३ तेधवां आपण वरसा. तेतीस उमर होती | |

बहुळचे पूर्वील वतनदार आपल्या बापाचे माझे आजे दामोदर जोशी शांडील गोत्री आपले पिते दादोबा हे मातामह यासी उदक तर्पणी देत होते ते वंशावली लिखिते तेथील मूळ पुरूश विटावा त्याचा पुत्र किटावा त्याचा पुत्र नागजोशी त्याचा पुत्र दामोधर जोशी त्याचा पुत्र गुंड जोसी आपल्या बापाचा मामा त्याची वंशावळी बुडाली म्हणून दामोधर जोशी त्याचा पुत्र गुंड जोशी उभयेता पितेपुत्र आपली कन्या चांदाई गुंड जोशी याची बहीण तिचे पोटी वडील पुत्र रामेश्वरभट त्याहून धाकटा अंतोबा त्याहून धाकटा आपला बाप दादोबा त्याहून धाकटा नरहरी हे वंशावळी आपले म्हातारपण जागून आपले सत्य पूर्वज स्मरोन वंशावलो लेहोन दिधली असे बी दस्तुर सिवाजी राम

❀ [ समाप्त ] ❀

---

१ जन्म श. १४८७ मृत्यु श. १५७७ = इ. १५६५-१६५५.

### मराठी राजवटींतील कांहीं घाटमार्ग व चौक्या-संकीर्ण

# सूचि

ह्या सूचींत वर्णानुक्रमानें स्थळनामें व व्यक्तिनामें घेतलीं आहेत. अनुस्वाराची बाराखडी औ-नंतर घेतली व नंतर जोडाक्षरें घेतलीं आहेत.

# श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर स्मारक ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेले ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १ दिल्ली दरबारांतील मराठी राज्याचे वकील हिंगणे ह्यांचें दप्तर—भाग २ | ग. ह. खरे | १९४७ |
| २ सरदार पेठे दप्तर—भाग १ | वि. सि. चितळे | १९४८ |
| ३ ऐतिहासिक फारसी साहित्य खं. ४ | ग. ह. खरे | १९४९ |
| ४ सरदार पेठे दप्तर भाग २ | वि. सि. चितळे | १९५० |

---

श्री. केशव गणेश शारंगपाणी यांनीं आर्यभूषण मुद्रणालय,
घ. नं. ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४ येथें छापिलें व
श्री. रा. वि. ओतुरकर चिटणीस भा. इ. सं. मंडळ, यांनीं
३१३ अ, सदाशिव पेठ, पुणें २ येथें प्रसिद्ध केलें.